# नवभारत

वर्ष १० वें ] फेब्रुवारी १९५७ [ अंक ५



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# ' नवभारत ' निधी

## – विनंति –

' नवभारत ' मासिक पुढें चालू रहावें; त्याची कार्यक्षमता वाढावी, या दृष्टीनें त्यास कांहीं आर्थिक स्थैर्य लाभावें याकरितां किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां जें एक विनंति-पत्रक प्रसिद्ध झालें तें विदितच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, डॉ. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. वा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिंदु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजी महाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळया भागांतील निरनिराळया क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

' नवभारत ' निधि पुढें येतें वर्ष चालूं राहणार आहे. मूळ विनंतिपत्रकांतील विनंतीस मान देऊन 'नवभारत'-निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, अशी आमची प्रार्थना आहे. नवभारत '-निधीस १०० रु. ची देणगी देणारास ' नवभारत ' मासिक दहा वर्षें मिळत राहील.

' नवभारत ' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें व पोहोंच ' नवभारता 'च्या दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

डिसेंबर १९५६ नंतर पुढील देणग्या आल्या आहेत.

डॉ. ग. बा. मोहिले F. R. C. S.

अहमदाबाद १०० रु.

मंत्री, गंगोत्री ट्रस्ट, अहमदाबाद १०० रु.

' नवभारत 'निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमलेली आहे : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर ( खजिनदार ), श्री. कृ. ना. फडके व श्री. मा. प. मंगुडकर ( संयुक्त कार्यवाह ).

' नवभारत ' निधिसमितीचें कार्यालय " C/o 'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजीनगर पुणें ४ " येथें आहे. देणग्या, " खजिनदार नवभारत निधि समिति, ९०६ शिवाजीनगर पुणे ४ " या पत्यावर पाठवाव्यात अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** ( अध्यक्ष )

२५।१।१९५७ **कृ. ना. फडके** }
पुणें ४ **मा. प. मंगुडकर** } कार्यवाह

---

## पोंच

१. कवि मुक्तेश्वरकृत ओवी रामायण : सं. भा. पं. बहिरट, पंढरपूर संशोधन मंडळ, पंढरपूर.

२. समाजवादी समाजरचना : स. मा. गर्गे, नवीन किताबखाना, पुणें.

३. स्त्रियश्चरित्रम् आणि इतर वर्मकथा : सदाशिव आठवले, सुरस ग्रंथमाला, सोलापूर.

अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष अकरावें

अंक पांचवा

# नवभारत

फेब्रुवारी

१९५७

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
४४६ शीव रोड, मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

# 'नवभारत' मासिक, फेब्रुवारी १९५७

## —लेखक-परिचय—

**श्री. ना. गो. चापेकर** ( बदलापूर ) – महाराष्ट्रांतील प्रसिद्ध विचारवंत व समाजशास्त्रज्ञ.

**श्री. जिनेंद्र आ. नाईक** : मुंबई विद्यापीठाच्या समाजशास्त्र विभागांतील विद्यार्थी. 'आमचा गांव', 'समाजनियंत्रण', 'वैदिक निबंध' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**डॉ. कु. सरोजिनी बाबर** : एम्. ए., पीएच्. डी. ( पुणें ) – 'कमळाचं जाळं', 'अजिता', 'भारतीय स्त्रीरत्नें', 'देवदर्शन' इत्यादींच्या लेखिका. 'समाज-शिक्षण-माले'च्या संपादिका.

**आचार्य मो. वा. दोंदे** : मुंबईतील प्रसिद्ध सामाजिक नेते, मुंबई लेजिस्लेटिव कौन्सिल, मुंबई कार्पोरेशन, मुंबई विद्यापीठाचें सिनेट इ. चे सदस्य, मुं. रा. प्रा. शिक्षक संघटनेचे प्रमुख, अ. भा. प्रा. शिक्षक परिषदेचे अध्यक्ष.

**श्री. ह. कृ. मोहनी** : "नवभारत" मासिकाचे एक संपादक.

**श्री. चा. अ. दाभोळकर** : सातारा येथील एक वकील.

**डॉ. ना. ग. जोशी** : एम्. ए., पीएच्. डी. ( बडोदें ) – 'जीवनयोग', 'विश्वमानव' इत्यादि काव्यांचे व 'मराठी छंदोरचना ( लयदृष्ट्या पुनर्विचार )' या पुस्तकाचे लेखक.

**श्री. स. मा. गर्गे** : पुण्याच्या 'सकाळ' पत्राचे सहसंपादक, "सुलभ राज्यशास्त्र", "राज्यशास्त्राचा विकास" या ग्रंथांचे लेखक.

**प्रा. अ. भि. शहा** : पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजांतील गणितशास्त्राचे प्राध्यापक.

**प्रा. श्री. गो. हुल्याळकर** : पुण्याच्या स. प. कॉलेजचे उपप्राचार्य, व तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

---

चुकीची दुरुस्ती.

टीप : 'नवभारता'च्या जानेवारी अंकांतील लेखकपरिचयांत प्रा. सुमंत मुरंजन यांच्या विषयींच्या परिचयात्मक मजकुरांत "सिडेनहॅम कॉलेजचे प्राचार्य" असा उल्लेख आहे. त्याऐवजी "सिडेनहॅम कॉलेजचे माजी प्राचार्य" असें वाचावें.

श्री. ना. गो. चापेकर

# देव-कल्पना : कांहीं विचार

प्रत्यक्ष देव अचल व निष्क्रिय असेल; तथापि देवविषयक कल्पना सारख्या बदलत गेल्या आहेत. मात्र देवाच्या अस्तित्वावर लोकांचा आरंभापासून विश्वास असल्याचें आढळतें. कल्पनेंतसुद्धां देव नव्हता असा काळ असूं शकणार नाहीं असें म्हणतां येणार नाहीं हें खरें, परंतु असा काल असलाच तर तो फारच अल्प असला पाहिजे. तथापि आजच्याप्रमाणें देव नाहीं असें ठासून सांगणारा कोणी असल्याचें इतिहास सांगत नाहीं. देवाविषयीं विचारच नाहीं, देव आहे, देव नाहीं व देव असेल किंवा नसेल असे देवविषयक कल्पनांचे चार प्रकार संभवतात.

## देवासंबंधीच्या विविध कल्पना

जोंपर्यंत देवाची भेट होत नाहीं तोंपर्यंत देवाची कल्पनाच करावी लागणार हें उघड आहे. त्याचप्रमाणें माणसाची बुद्धि कमजास्त विकसित असेल त्याच प्रमाणांत अगर तदनुरूप देवाची मूर्ति तो आपल्या मनांत घडविणार हेंहि तितकेंच खरें आहे. तसेंच, परिस्थितीप्रमाणें बुद्धीचा विकासहि वेगवेगळीं रूपें धारण करीत असतो हेंहि लक्षांत बाळगणें अवश्य आहे. ही परिस्थिति प्राय: निसर्गजन्य असते. बारा तासांच्या अंतरानें जेथें सूर्य दृष्टीस पडतो तेथें सूर्याचें महत्त्व कोणास वाटत नाहीं; ह्याच्या उलट षड्मासांनीं सूर्यदर्शन होणाऱ्या लोकांचा सूर्य हा देव बनतो. तोच प्रकार अग्नीचा. हिमप्रदेशांत अग्नीला देवत्व प्राप्त होण्यास विलंब लागत नाहीं. जंगली मुलुखांत वृक्षांच्या वांट्यास देवपण येतें. वरील परिस्थिति नसलेल्या सपाट देशांत मेलेलीं माणसेंच देव होतात.

माणसांमध्यें स्त्री व पुरुष अशीं दोन स्वरूपें असतात; तदनुसार मनुष्याच्या कल्पनाशक्तीनें कांहीं देव बनविले, तर कांहीं देवी बनविल्या.

सृष्टीमध्यें केवळ माणसें नसतात. पशु, पक्षी, सर्प यांनींहि ती गजबजलेली आहे. मग कित्येकांनीं सर्पराज जो नाग त्याला देव कल्पिला तर आश्चर्य नाहीं. दुसऱ्यांनीं गाय, बैल ह्यांस देवस्थानीं आणून बसविलें. गरुडपक्षी हा सुद्धां दुसऱ्या कित्येकांचा देव झाला. तात्पर्य, चराचर सृष्टि देवकल्पनेनें व्यापलेली आढळेल.

नागाप्रमाणें कांहीं जमातींनीं वाघांची देवपदीं स्थापना केली आहे. पुढेंपुढें सिंहादि सर्व प्राण्यांना देवांचीं वाहनें बनविलीं.

## देव-कल्पनेचीं उगमस्थानें

एखादी वस्तु कितीहि हितावह असली तरी ती प्राकृत माणसाला नमवावयास लावीत नाहीं; परंतु जर भयावह असेल तर तिच्यापुढें मनुष्य लोटांगण घालतो. हवेवांचून मनुष्य जिवंत राहणार नाहीं असें असून तिची पूजा कोणी केली नाहीं. उलट, वादळ झालें, सोसाट्याचा वारा सुटला कीं, लगेच मरुतांची स्तुति करण्यास मनुष्य प्रवृत्त होतो. सारांश, भीति उत्पन्न करणारा तो देव अशी देवाची व्याख्या करितां येईल.

भीति, आश्चर्य व उपयुक्तता हीं देवकल्पनेचीं उगमस्थानें होत. ह्यांमध्यें कालानुक्रम लावावयाचा झाला तर भीतीलाच अग्रस्थान द्यावें लागेल. सुखानें काल कंठीत असतांना आपणांस देवाची आठवण होत नाहीं, परंतु संकट येतांच देव आठवतो. आद्य मानवानें नैसर्गिक संकटें अनुभविलीं असलीं पाहि-








जेत, भूकंप, अतिवृष्टि, अनावृष्टि, झंझावात, रोगांची सांथ ह्या निसर्गजन्य आपत्ती होत. त्या ओढवल्या म्हणजे मनुष्य अगदीं गांगरून जातो. तीं संकटें मनुष्यावर सोडणारी कोणीतरी अतिसामर्थ्यवान् व्यक्ति असली पाहिजे असें त्यास वाटूं लागतें आणि मग ह्या अव्यक्त व्यक्तीची आराधना करण्यास तो सुरुवात करितो. ह्यांतच उपासना पद्धतीचें बीज आढळतें. तसेंच, ईश्वर हा कोणी श्रेष्ठ आहे व तो वेत्रधारी पंतोजी आहे अशी त्याची समजूत होते. अर्थात् ईश्वर दयाळु आहे ही कल्पना आरंभीची नाहीं. म्हणून प्राथमिक मनुष्याच्या अन्तःकरणांत देवाविषयीं प्रेमाच्या ऐवजीं भीति ठाव धरते. मनुष्याला कांहीं वस्तु दिली म्हणजे तो प्रसन्न होऊन आपलें काम करितो ह्या अनुभवावरून बलिदानाची कल्पना उदय पावली. माणसाला खावयास मिळालें नाहीं म्हणजे तो क्रुद्ध होतो; त्याला खाण्यास मिळालें म्हणजे त्याचा क्रोध शमतो ही गोष्ट प्राथमिक अवस्थेंतील मनुष्याच्या परिचयाची असते. कारण, माणसाची पहिली गरज अन्नाची हें सांगावयास नको.

## देव-कल्पनेचा विकास

मेलेलीं माणसें देव बनण्यापूर्वी भुतें होत असल्याची कल्पना प्रचलित होती असें मानण्यास भरपूर पुरावा मिळण्यासारखा आहे. मृत्यूनंतर प्राण्याचें सामर्थ्य वाढतें व तो प्राणी सूडबुद्धीनें संकटें निर्माण करितो ह्या समजुतीनें भूतांची देवभावनेनें आराधना होऊं लागली. कोणताहि रोग होवो, भूतबाधा झाली असें मानणारा मोठा जनसमूह भारतांत आहे. ह्यास्तव भुतें काढणें हा एक धंदा झाला. हा धंदा करणाऱ्यांना भगत म्हणतात. कोणत्या भूतानें रोग उत्पन्न केला व तो कोणत्या उपायानें हटेल ह्याचें विवरण भगत करतो. अशा रीतीनें भगत हा उपाध्या व वैद्य अशीं दुहेरी कामगिरी बजावतो. ह्या कालांत देवाची कल्पना, एक अद्भुत पण अनर्थकारक कृति करणारी अदृश्य व्यक्ति एवढीच असते.

मेलेलीं माणसें भुतें होतात ह्या समजुतीनें स्मशान हें भुतांचें जन्मस्थान झालें आणि ह्या भुतांचा राजा चितेची राख अंगाला फासणारा व प्रेतांच्या मस्तकांच्या कवट्यांची माळ गळयांत धारण करणारा शिव नामक देव बनला. ह्याच कारणानें शिवाचें देवालय गांवाबाहेर असतें.

सर्वांत मोठा चमत्कार म्हणजे प्राण्याच्या जन्माचा होय. स्त्रीयोनींत पुरुषरेताचा थेंब प्रवेश करितो. गर्भधारणा होते. स्त्रीच्या पोटांत तो गर्भ वाढत वाढत त्याचा अनेक अवयवयुक्त शरीरधारी मानव बनून तो यथावकाश ह्या भूमीवर येऊन पडतो. एका माणसाचीं दोन माणसें होतात. हा प्रकार कोणालाहि आश्चर्यानें थक्क करून सोडणारा आहे; मग प्राकृत मनुष्य ह्या लिंगाचीच पूजा करूं लागला, तर त्याला आपण नांवें कशीं ठेवणार ? लिंगपूजेची उत्पत्ति आश्चर्यकारक घटनेंत आहे.

कालान्तरानें ही देवाची कल्पना विचारवन्तांना असमाधानकारक वाटली. देव आहे तरी कसा, तो कोठें असतो, तो काय करितो ह्या प्रश्नांचीं उत्तरें शोधण्याची धडपड सुरूं झाली. देव दिसत नाहीं व ह्या पृथ्वीवर आपणांस आढळत नाहीं त्यामुळें तो आकाशांत असावा असा तर्क साहजिकच करण्यांत आला. तेथें बसून तो भक्तांचा सांभाळ करितो व अभक्तांचें पारिपत्य करितो अशी तोड कित्येकांनीं काढली. ह्यामुळें जगांत कांहीं सुखी व कांहीं दुःखी कां ह्या शंकेचें समाधान करितां आलें. देवाला भजा, त्याच्यावर पूर्ण विश्वास ठेवा म्हणजे तुम्हांला चिरंतन सुख लाभेल, असें आश्वासन देवदूत लोकांना देऊं लागले. हा आकाशांतील बाप अशरीरी अगर निराकार आहे असें म्हणतात. कारण शरीर आहे असें प्रतिपादण्यांत असंख्य अडचणी उद्भवणें अपरिहार्य आहे. तरीपण हा निरवयव देव, सृष्टि निर्माण करितो व पृथ्वीवर आपला दूत पाठवितो. निराकार देव मनांत कसा आणा-










वयाचा हें स्पष्टपणें कोणी सांगत नाहीं. निरीन्द्रिय व निरवयव इतकेंच नव्हे तर आकारहीन देव कसा असेल ह्याची कल्पना करितां येणें दुर्घट आहे. हिंदुतत्त्वज्ञानांत देव अथवा अंतिम तत्त्व अनंत आहे; निराकार नाहीं.

भुताखेतांची जागा देवविचारानें घेतल्यानंतर देवाच्या एकत्वाविषयीं एकवाक्यता असलेली दिसते. देव असलाच तर तो सर्वज्ञ, सर्वशक्तिमान असला पाहिजे ही कल्पना करणें भाग पडतें. दुसरा सर्वज्ञ उभा केल्यास पहिल्याच्या श्रेष्ठत्वाला कमीपणा येणार, हें सहज समजण्यासारखें आहे. ह्यास्तव परमेश्वर कितीहि वेगवेगळया स्वरूपांत चितारला तरी त्याचें अद्वितीयत्व सर्वमान्य झालें. देव एक असून जगांतील सर्व मानव त्याचींच लेकरें आहेत, ह्याला मान्यता दिल्यानंतर निराळे धर्म असण्याचें वस्तुतः कारण उरत नाहीं. उपासनापद्धती भिन्न होऊं शकतील, परंतु तत्त्वतः धर्मभेद असूं शकणार नाहींत.

## द्वैती व अद्वैती

देवाविषयीं आपण विचार करावयास लागलों कीं, देव आणि मनुष्य ह्यांचा संबंध काय हा प्रश्न उद्‌भवतो. देव एक असून सर्वव्यापी आहे तर मग त्यानें सृष्टि निर्माण कशापासून केली ? मनुष्यप्राण्याला देवानें भजन करण्यासाठींच निर्माण केलें कीं काय ? ह्या प्रश्नांचीं उत्तरें शोधतांना द्वैती व अद्वैती असे दोन प्रमुख धर्मपंथ अस्तित्वांत आले. मनुष्य हा देव कधींच होणार नाहीं, तो मनुष्यच राहील ही सामान्यतः द्वैत्यांची भावना असते. देवाची कृपा संपादन करणें हें ध्येय ओघानेंच ह्या पंथाला स्वीकारावें लागलें; म्हणून देवाला प्रसन्न करून घेण्याकरितां भक्तिमार्गाचा अवलंब ह्या पंथानें केला. भक्तीचें अधिष्ठान, देव व मानव ह्यांच्या श्रेष्ठ-कनिष्ठतेवरील श्रद्धा हें होय. मनुष्य हा मनुष्यच राहील, त्याला देवत्व प्राप्त होणें अशक्य आहे असा द्वैत्यांचा सिद्धांत. शंकरानुयायी वगळले तर सर्व जग द्वैती आहे असें मानण्यास हरकत नाहीं. द्वैत्यांच्या देवाचें स्वरूप काय आहे हें न विचारलेलेंच बरें. ह्याच्या उलट, अद्वैत्यांची स्थिति. त्यांनीं देवाचें उच्चाटन केलें आहे. कारण मीच देव, माझ्या व्यतिरिक्त दुसरा देव नाहीं असें ते आग्रहानें प्रतिपादितात. त्यांचा देव म्हणजे ब्रह्मतत्त्व. सत् , चित् , आनंद हें त्याचें स्वरूप. आपण ज्याला जड म्हणतों तें वस्तुतः चित्‌च आहे, असें त्यांचें म्हणणें. देव जर एक आहे तर दुसरी वस्तु येणार कोठून असा रोखठोक प्रश्न ते विचारतात. मग हें दुसरें निराळें दिसतें तें काय ह्या प्रश्नाला तुमचा भ्रम हें त्यांचें उत्तर. खरोखर दोरी असून तो सर्प समजून आपली गाळण उडते, नाहीं कां ? तसेंच दोरीचें ज्ञान होतांच आपली भीति पार उडून जाते व तो मानीव सर्प आपण हातांत धरून निःशंक होतों. हें या पंथाचें तत्त्वज्ञान.

देव व मनुष्य-प्राणी ह्यांचे परस्पर संबंध कसे आहेत ह्याचा खुलासाहि वरील दोन पंथांच्या तत्त्वज्ञानावरून होण्यासारखा आहे. व्यावहारिक नांवावरूनसुद्धां मनुष्य कोणत्या संप्रदायाचा आहे हें समजतें. उदाहरणार्थ, नारायणदास हें नांव द्वैत संप्रदाय सुचविणारें आहे. उलट, नारायण ह्या नांवाचा मनुष्य अद्वैताभिमानी आहे म्हणून समजावें. द्वैती मनुष्य सायासानें देवाचा अनुग्रह व्हावा म्हणून झटत असतो तर अद्वैती मनुष्य स्वस्वरूपाचें ज्ञान करून घेण्यासाठीं श्रवण, मनन, निदिध्यास ह्यांत मग्न असतो. ‘ अहमेव ब्रह्मास्मि ’ ह्या अनुभवाला ज्ञान म्हणतात, म्हणून ज्ञानानंतर जन्म नाहीं हा उपसिद्धांत प्रचलित झाला. ह्या सिद्धांताच्या समर्थनार्थ जन्म हें अज्ञानाचं फल आहे असें मानणें भाग पडलें. ज्ञानापासून अज्ञानाची उत्पत्ति कशी झाली हें विचाराल तर जग उत्पन्नच झालें नाहीं असें सांगण्यांत येतें.

ह्याशिवाय बहुतेकांना अशक्य असलेल्या स्वानुभूतीकडे बोट दाखवून सर्व तर्कजालग्रस्त होईल

असें आश्वासन देण्यांत येतें. आत्मज्ञानी जन्ममृत्यू-पासून मुक्त होतो, ह्यास्तव मुक्ति अथवा मोक्ष हें अत्युच्च ध्येय बनलें. अर्थातच लोकांना जन्म हें महासंकट आहे, तें अज्ञानाचें फल असल्यामुळें लांछनास्पद आहे, असा उपदेश ज्ञानी समजले गेलेले लोक करूं लागले. त्याचा परिणाम इह नाहीं व पर नाहीं अशा दुरवस्थेंत लोक राहूं लागले. जन्म आला म्हणून काय झालें ? सत्कर्मी त्या जन्माचा उपयोग करा असें सांगणारा संत भारतांत निर्माण झाला नाहीं.

### एक शंका

आणखी एक शंका उद्‌भवली. देव जर कृपाळू व न्यायी आहे तर कांहीं लोक दु:खी कां ? असें आपल्या मनाला विवेकीलोक विचारूं लागले. तेव्हां पूर्वजन्मांतील त्याचें दुष्कर्म हें उत्तर सांपडलें. परमेश्वर कांहींच करीत नाहीं, प्रत्येकाला कर्मानुसार सुखदु:ख प्राप्त होतें हा न्याय प्रतिपादण्यांत येऊं लागला. ह्याकारणानें पूर्वजन्म व पुनर्जन्म ह्यांचें अस्तित्व मानणें क्रमप्राप्त झालें. कर्मसिद्धांतानें मोक्षसिद्धांत मागें पाडावयास पाहिजे होता. कारण, कर्मतत्त्वानुसार सत्कर्माचें फळ चांगलेंच मिळणार मग जन्माला भिण्याचें प्रयोजन काय, हा विचार प्रबळ होणें स्वाभाविक होतें; पण तसें झालें नाहीं. कर्मयोगावरहि एक आक्षेप घेण्यांत येतो. जगाच्या आरंभापासून आज तागायत कोट्यवधि लोक गुलाम-गिरींत खितपत पडलेले दिसतात. ह्या सर्वांनीं दुष्कर्में केलीं होतीं हें म्हणणें सयुक्तिक दिसत नाहीं.

तात्पर्य, ह्या सर्व कल्पना म्हणजे बुद्धीचे विलास होत. मानवाला परमेश्वराचें साक्षात् ज्ञान होणें असंभवनीय आहे, ह्यांत शंका नाहीं. ईश्वराचें ज्ञान होणें हें ईश्वरत्वाला कमीपणा आणणारें आहे. ह्यास्तव ईश्वरविषयक कोणतीहि कल्पना सदोष अस-णार हें गृहीत धरूनच चाललें पाहिजे. आक्षेप घेतां येणार नाहींत असें ईश्वरविषयक एकहि तत्त्व-ज्ञान आढळणार नाहीं. त्यांतल्यात्यांत कमी निर्दोष कोणतें, हाच विचार अखेरीस सयुक्तिक ठरणार. ह्यावरून सामान्य माणसाला घ्यावयाचें तें हें कीं, अज्ञेय ईश्वराला धुंडाळण्याचा आयास न घेतां त्याचा प्रतिरूप जो मानव त्यालाच ईश्वर समजून ह्या समजुतीला साजेल अशी वागणूक माणसानें माणसाशीं ठेवावी हेंच उत्तम; हाच खरा धर्म.

---

## अर्थशास्त्राचा अभ्यास

मी जे विचार आणि जे सिद्धांत स्वीकारले आहेत त्यांना अनुसरून मी आपलें जीवन व्यतीत करण्याचा नेहमीं प्रयत्न करीत असतों. जें आचरणांत आणलें जातें तेंच खरें ज्ञान होय. कोणत्याहि वस्तूचा अनुभव घेतल्यावांचून तिचें यथायोग्य ज्ञान होऊं शकत नाहीं. नुसती बौद्धिक धारणा बेभरवशी आहे. तो केवळ शब्दांचा खेळ आहे. मी एक वर्षपर्यंत अर्थशास्त्राचा अभ्यास केला. त्या दिवसांत मी रोज दोन आण्यांत आपली उपजीविका करीत असे. माझे मित्र विचारीत असत कीं; "अर्थशास्त्राचा अभ्यास करण्याकरितां दोन आण्यांत रोजचा खर्च भागविण्याची काय आवश्यकता आहे ?" जगांत गरिबी फार आहे. भारतांत तर सर्वां-नाच तिचा परिचय आहे. परंतु या गरिबीचें ज्ञान केवळ शब्दरूपानेंच होत असलेलें दिसतें. तिच्या बाब-तींत स्वानुभव किती लोकांना आहे ? मी अर्थशास्त्रा-चीं चार-पांच पुस्तकें वाचलीं असतील. परंतु मी कष्ट केले आणि सामाजिक उत्पादनावर गंभीरपणें विचार केला. वर्षभरांत मला अर्थशास्त्राच्या मूलभूत नियमांचें फार चांगलें ज्ञान झालें.

– विनोबा

श्री. जिनेंद्र नाईक

# जीवनदान आणि सामाजिक बदल

## जीवनदान आणि जीवनमूल्यें

या लेखांत 'जीवनदान' हा शब्द "एखाद्या विशिष्ट कार्यासाठीं संपूर्ण आयुष्यभर स्वतःला अगोदरच शपथेनें बांधून घेण्याच्या पद्धती" बद्दल वापरलेला आहे.

भारतांत कोणत्याहि एका सांस्कृतिक धार्मिक किंवा सामाजिक कार्यासाठीं जीवनदान करण्याची किंवा संपूर्ण जीवन एका विशिष्ट कार्यासाठी देण्याच्या शपथा घेण्याची, पद्धत ही फार पूर्वींपासून चालत आलेली आहे. सामाजिक, सांस्कृतिक किंवा धार्मिक कार्याचा गाडा हा त्या कार्याशीं किंवा चळवळीशीं पूर्णपणें एकरूप होऊन कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांच्या संख्येवर बहुश: अवलंबून असतो. पण अशा रीतीनें एकाच कार्यासाठी सर्व जीवन देण्याला अगोदरच बांधून घेणारी पद्धत योग्य आहे काय ? प्रामुख्यानें याच प्रश्नाचा येथें ऊहापोह करावयाचा आहे.

ज्या वेळेला एखादि व्यक्ति एका विशिष्ट कार्यासाठीं जीवनदान देते तेव्हां तिच्यापुढें कांहीं जीवनमूल्यें असतात. त्या मूल्यांना साकार रूप देण्यासाठीं त्या व्यक्तीची तीव्र आंतरिक तळमळ असते. तोच तिचा जीवनमंत्र होऊन बसतो. अशावेळीं ती व्यक्ति या निर्णयाला येते कीं त्या एका विशिष्ट जीवनमूल्यासाठीं घडपडणें हेंच तिचें जीवनकार्य. आणि एक दिवस त्या कार्यासाठीं जीवनदान दिल्याचें ती व्यक्ति स्वमनाशीं निश्चित करते; किंवा आपल्या कार्याला संघटित उठाव मिळावा म्हणून त्या प्रमाणें जाहीर करते.

## जीवनमूल्यांतील बदल

जीवनमूल्यें हीं नेहमी संबद्ध असतात. मानवी जीवनाशीं तीं संबंधित असतात. मानवी जीवनाशीं असंबद्ध असें जीवनमूल्यांना स्वरूप किंवा स्थानच नसतें. मानवी जीवनाशीं असणारा मूल्यांचा संबंध हा त्या मूल्यामध्यें असणाऱ्या ( किंवा त्या मूल्याबद्दल वाटणाऱ्या ) आकर्षणामुळें निर्माण होतो. बदल हा आकर्षणाचा स्थायिभाव आहे. मूल्यांच्या आकर्षणामध्यें होणारा बदल हा मुख्यतः दोन कारणामुळें होतो. ( १ ) ज्या व्यक्तीच्या जीवनाशीं तीं मूल्यें निगडित असतात त्या व्यक्तीच्या मनोबदलामुळें; ( २ ) ज्या एका विशिष्ट सामाजिक परिस्थितींत तीं मूल्यें अस्तित्वांत असतात त्या सामाजिक परिस्थितींत होणाऱ्या बदलामुळें.

( १ ) वर सांगितल्याप्रमाणें व्यक्तीचा आणि तिच्या जीवनमूल्याचा निगडित संबंध आहे. तेव्हां व्यक्तीच्या मनोबदलामुळें तिच्या जीवनाशीं निगडित असलेल्या जीवनमूल्यांमध्येंहि बदल होणें अपरिहार्य आहे. व्यक्तीचा हा मनोबदल सामाजिक जीवनांतल्या बदलामुळें किंवा भोंवतालच्या नैसर्गिक ठेवणींतल्या बदलामुळें होण्याची शक्यता आहे. नैसर्गिक परिस्थितींतला बदल हा बहुतांशीं मानवी प्रयत्नांच्या बाहेरचा असतो. तेव्हां त्याचा आपण विचार करण्याचें कारण नाहीं. आणि सामाजिक जीवनांतल्या बदलामुळें होणाऱ्या मनोबदलाचा नंतर विचार करूं. तूर्त अशा व्यक्तीच्या मनोबदलाला तिचें विशिष्ट मानस आणि शरीरच कारणीभूत आहे, एवढेंच धरून चालूं या. त्याच्या मनाचा नैसर्गिक कमजोरपणा किंवा अस्थिरपणा, किंवा त्याच्या अंग-घडणींतील दोष, यामुळें तिचा मनोबदल होण्याची शक्यता आहे. पण यासुद्धां अवस्था तिच्या सामाजिक जीवनाशी पुष्कळ अंशीं निगडित असल्यामुळें मुख्यत: आपण त्याच कारणाचा विचार करणें युक्त होईल.

( २ ) बदलणाऱ्या जीवनमूल्यांना दुसरें एक जें प्रमुख कारण आहे तें हें कीं ज्या एका विशिष्ट सामाजिक परिस्थितींत तीं मूल्यें अस्तित्वांत असतात त्या सामाजिक परिस्थितींत होणारा बदल. मनुष्याच्या सामाजिक जीवनांत, किंवा त्याच्या भोंवतालच्या सामाजिक परिस्थितींत होणारा बदल हाहि मुख्यत: दोन कारणांनीं होतो. ( अ ) त्याच्या भोंवतालच्या









नैसर्गिक ठेवणींतल्या बदलामुळें; आणि ( ब ) परस्परांत होणाऱ्या मानवी व्यवहारांतल्या बदलामुळें.

( अ ) निसर्ग, त्याची ठेवण, किंवा करणी ही मानवी प्रयत्नांच्या बाहेरची शक्ति आहे. मानवी जीवनावरती तिचा परिणाम होणें अपरिहार्य आहे. होणाऱ्या परिणामाची दखल घेऊन, किंवा अटकळ करून मनुष्य आपलें जीवन, असेल त्या परिस्थितींशी सामना देत देत बदलूं शकतो. पण ती नैसर्गिक परिस्थिति सर्वथा बदलूं शकत नाहीं. नैसर्गिक देणगी आहे तशी, किंवा थोड्या फार फरकानें, त्याला घ्यावी लागते; अन् त्याप्रमाणें जीवन जगावें लागतें.

( ब ) मानवी मूल्यांच्या मध्यें होणारा बदल हा मुख्यतः मानवी व्यवहारांत होणाऱ्या बदलामुळेंच होत असतो. तेव्हां त्याच एका गोष्टीचा आपण साकल्यानें येथें विचार करूं.

## मूल्यांच्या श्रेणींतील चढउतार

लेखाच्या सुरुवातीलाच सांगितल्या प्रमाणें मूल्याचें आकर्षण बदलतें किंवा अस्थिर असतें. त्याच्या या बदलत्या गुणधर्मामुळें ज्या प्रकारची सामाजिक परिस्थिति येईल तसें महत्त्व त्या मूल्यांना प्राप्त होणें अपरिहार्य असतें. या त्याच्या बदलत्या गुणधर्मामुळें, आणि माणसाच्या सामाजिक जीवनाशीं असणाऱ्या त्यांच्या निगडित संबंधांमुळें, मूल्याच्या गुणांमध्यें चढउतार निर्माण होतो, जें सामाजिक मूल्य आज पहिल्या प्रतीचें वाटतें तेंच जीवनाशीं निगडित झाल्यामुळें, एका विशिष्ट अशा बदललेल्या सामाजिक अवस्थेमध्यें उद्यां दुय्यम प्रतीचें किंवा हलक्या प्रतीचें वाटूं लागतें. याचा अर्थ असा नव्हे कीं मूल्याच्या अंगीं एक स्थायि-गुण असतो आणि तो बदलतो; मूल्याच्या अंगीं विशिष्ट असा त्याचा कोणताहि स्थायि-गुण नसतो. निव्वळ तीं मूल्यें मनुष्याच्या जीवनाशीं निगडित झालेलीं असतात. आणि म्हणून त्यांना एक विशिष्ट गुणधर्म प्राप्त झालेला असतो. माणसाचें जीवन हें बहुशः त्याच्या भोंवतालच्या सामाजिक जीवनाशीं निगडित झालेलें असतें. जेव्हां त्याची सामाजिक परिस्थिति बदलते तेव्हां त्याच्या जीवनमूल्यांतहि बदल होणें कदाचित अपरिहार्य ठरतें. जें मूल्य आज त्याला पहिल्या प्रतीचें वाटतें तेंच उद्या दुय्यम प्रतीचें वाटण्याची शक्यता निर्माण होते. यामध्यें मनुष्याचा कोणत्याहि प्रकारचा गुणदोष नाहीं. ज्या परिस्थितींत मनुष्य जगतो, वाढतो त्या परिस्थितीचा हा सारा प्रताप आहे.

## जीवनदानाची तात्त्विक बैठक

आतां आपण जीवनदान-पद्धतीकडे वळूं. जेव्हां एखादि व्यक्ति एका विशिष्ट कारणासाठीं किंवा कार्यासाठीं जीवनदान देते तेव्हां त्या व्यक्तीपुढें कांहीं जीवनमूल्यें असतात. त्या मूल्यांना मूर्तरूप देण्याची तिची आंतरिक तळमळ असते; धडपड असते. तिच्या जीवनगंगेचा प्रवाह त्याच एका विशिष्ट दिशेनें जावा यासाठीं तिचे सारे प्रयत्न असतात. आणि जेव्हां तिला राहवतच नाहीं, या विना करण्यासारखें विशेष महत्त्वाचें आयुष्यांत दुसरें कांहीं नाहीं असें तिला वाटतें, तेव्हां ती आपलें जीवनदान त्या एका विशिष्ट कारणासाठीं दिल्याचें जाहीर करते.

आपण वर पाहिल्याप्रमाणें व्यक्तीचें सामाजिक जीवन जसें बदलेल, किंवा त्याच्या भोंवतालच्या सामाजिक परिस्थितीमध्यें जसा बदल होईल, तसा तिच्या जीवनमूल्यांच्या क्रमांकांतहि बदल होणें संभवनीय असतें. तेव्हां ज्या गोष्टीसाठीं आपण जीवनदान देत असतो तिच्या भोंवतालची सामाजिक परिस्थिति ही नेहमी बदलणारी आहे काय, किंवा त्याच्या भोंवतालची सामाजिक परिस्थिति ही बाह्यपरिणामात्मक आहे काय, याचा प्रत्येक जीवनदात्यानें साकल्यानें विचार केला पाहिजे. आपण जीवनदान देत असलेलें क्षेत्र किंवा आपलें जीवनकार्य यावर बाह्य जगताचा किंवा बाह्य शक्तीचा दूरगामी परिणाम होणें अपरिहार्य असेल तर अशा क्षेत्रासाठीं जीवनदान करणें म्हणजे जीवनमूल्यांशीं स्व-वागणुकीची प्रतारणा करण्यासारखें होय. ज्या



अनुक्रमणिका






गोष्टीसाठीं आपण जीवनदान करतों ती गोष्ट किंवा तें जीवनमूल्य हें आपल्या कार्यक्षेत्रामध्यें नेहमीच पहिल्या क्रमांकाचें असावें लागतें. जेव्हां आपली सदसद्विवेकबुद्धि दुसऱ्याच एका कार्याला किंवा जीवनमूल्याला ज्यास्ती आपलेसें म्हणते, तेव्हां निव्वळ पूर्वी एका कार्यासाठीं जीवनदान दिलेलें आहे या सबबीवर, स्व-सदसद्विवेकबुद्धीला पटत नसतांना सुद्धां, तेंच कार्य करणें किंवा करूं इच्छिणें म्हणजे स्वतःशीं प्रतारणा करणें होय; आपल्यांतल्या बुद्धिवादाला मूठमाती देण्यासारखें होय. आणि म्हणूनच जीवनदानाचें क्षेत्र शोधतेवेळीं आपल्या कार्यक्षेत्रावर त्यांच्याशीं प्रत्यक्ष संबंधित नसलेल्या अशा बाह्य शक्तीचा, जर दूरगामी परिणाम होत असेल, आणि त्यामुळें आपल्या भोंवतालच्या सामाजिक परिस्थितींत जर आमूलाग्र बदल होत असेल, तर अशीं कार्यक्षेत्रें आपल्या जीवनदानासाठीं न शोधणें हेंच योग्य म्हटलें पाहिजे. कारण अशा बदललेल्या परिस्थितीमुळें आपलीं जीवनमूल्येंहि बदलतात किंवा त्यांचा क्रमांक बदलतो.

### जीवनदानाची भारतीय परंपरा : शिक्षणक्षेत्र

भारतांत जीवनदान करण्याची पद्धत फार पूर्वीपासून चालत आलेली आहे. कांहीं लोक धार्मिक कार्यासाठीं, कांहीं सांस्कृतिक कार्यासाठीं, तर कांहीं सामाजिक कार्यासाठीं जीवनदान करतात. सामाजिक कार्यासाठीं जीवनदान केलीं जाणारीं आजकालचीं मुख्य दोन क्षेत्रें आहेत. एक म्हणजे, शैक्षणिक; व दुसरें, सामाजिक चळवळीशीं प्रत्यक्ष निगडित असलेलें भूदानासारखें आंदोलन.

या देशांतल्या मोठमोठ्या शैक्षणिक संस्था, किंवा कोणत्याहि देशांतल्या मोठमोठ्या शैक्षणिक संस्था, या त्या संस्थेच्या जीवनदात्यांवर किंवा आजीव सभासदांच्या त्यागावर चालत आलेल्या आहेत. अशा शैक्षणिक संस्थांची भरभराट आणि सेवा, निव्वळ नोकरीसाठीं येऊन चांगली नोकरी दुसरीकडे मिळाल्यानंतर सोडून जाणाऱ्या उमेदवारी शिक्षकांपेक्षां, आजन्म त्याच एका शैक्षणिक संस्थेचें कार्य करूं इच्छिणाऱ्या सभासदांच्या त्यागावर अधिक अवलंबून असते. अशाच आजन्म सेवकांच्या त्यागामुळ त्या संस्थेचें समाजसेवेचें ध्येय लवकर साध्य होण्याची शक्यता असते. अशा संस्थेमध्यें जीवनदात्यांची संख्या वाढत्या प्रमाणांत हवी असते; समाजाच्या आणि शैक्षणिक संस्थेच्या हिताच्या दृष्टीनें ही प्रथा उपयुक्त ठरते; आणि इतिहासाचाहि हाच दाखला आहे. तेव्हां प्रश्न असा उद्भवतो कीं जीवनदानाची पद्धति इथें सदोष होऊं शकेल काय ? जर नसेल तर कां ?

शैक्षणिक संस्थांमधून काम करणारा शिक्षक हा एका विशिष्ट वळणामधून जात असतो. त्याच्या जीवनाचें वेळापत्रक किंवा जीवनक्रमाचें स्वरूप ठरून गेलेलें असतें. त्याच्या भोंवतालची सामाजिक परिस्थिति किंवा त्याचे ' स्व-सामाजिक जग ' हेंहि ठरून गेलेलें असतें. त्या स्व-सामाजिक जगामध्यें विशेष बदल होत नसतो. ( एखाद्या व्यक्तीचें ' स्व-सामाजिक जग ' म्हणजे ज्या समाजाशीं आणि जीवनपद्धतीशीं त्याचा सदोदित संबंध येतो, जी जीवनपद्धति त्याला आपलीशी वाटते, आणि म्हणून त्या पद्धतीनुसार तोहि आपला जीवनक्रम स्व-खुषीनें आखत असतो, असा त्या व्यक्तीच्या जीवनाशीं प्रत्यक्ष संबंधित असलेला समाज आणि त्याची जीवनपद्धति ह्या ) शिक्षण संस्थेंमधल्या जीवनदात्यांच्या स्व-सामाजिक जगामध्यें जरी बदल झाला तरी तो त्या समाजामधल्या, आणि संस्थेमधल्या, अंतर्गत बदलामुळें किंवा उलाढालीमुळें होत असतो. बाह्य शक्तीचा त्या जगावर तितकासा, प्रत्यक्ष फारसा बदल घडवून आणण्याइतका परिणाम होत नसतो. अशा व्यक्तीचें स्व-सामाजिक जग हें स्व-संवेद्य असतें; बाह्य-परिणामात्मक नसतें. या सर्व कारणामुळें, बाह्य जगतामध्यें कितीहि जरी बदल झाला तरी अशा शिक्षणसंस्था आणि अशा संस्थेंमधल्या जीवन-










दात्याचें जीवन हें संथपणें चाललेलें असतें. अशा संस्थेमध्यें कार्य करणाऱ्या जीवनदात्याचें ध्येयसुद्धां ठराविक असल्यामुळें, आणि ज्या सामाजिक जगामध्यें तो जगत असतो त्या जगाचीहि वाटचाल त्याच दिशेनें होत असल्यामुळें, त्याच्या जीवनमूल्याच्या क्रमांकांत तितकासा बदल होण्याची शक्यता नसते. माणसाच्या जीवनमूल्याच्या मधला बदल हा बहुश: त्या व्यक्तीच्या स्व-सामाजिक जगाच्या गुणधर्मावर अवलंबून असतो. जर तें सामाजिक जग बाह्यपरिणामात्मक असेल, किंवा बाह्य शक्तीचा त्या जगावर जर सहजासहजीं आणि दूरगामी परिणाम होत असेल, तर अशा सामाजिक जगामध्यें वावरणाऱ्या व्यक्तींच्या जीवनमूल्यांच्या क्रमांकांत सतत बदल व चढउतार राहणार. किमानपक्षीं जीवनमूल्यांच्या त्यांच्या कल्पनेंत तरी सतत बदल होणार. पण स्व-सामाजिक जग जर स्व-संवेद्य असेल, बाह्य जगांतल्या इतर बदलांचा त्या जगावर जर सहजासहजीं आणि दूरगामी परिणाम होत नसेल, तर अशा क्षेत्रांमध्यें जीवनमूल्यें ही सर्वसामान्य परिस्थितींत ( क्रांति व्यतिरिक्त काळांत ) विशेष बदलत नाहींत. शिक्षण संस्थांतल्या जीवनदात्यांची हीच परिस्थिति आहे; आणि म्हणून जीवनदान-पद्धति, सुव्यवस्थित जगांत बाधक नाहीं.

## भूदानाची सामाजिक पार्श्वभूमि

आतां आपण भूदानासारख्या सामाजिक आंदोलनांतल्या जीवनदानपद्धतीकडे वळूं. विनोबाजींनीं भूदानाचें आंदोलन सुरू केलें, आणि त्याला संघटितपणें जोरदार उठाव मिळावा म्हणून जयप्रकाश नारायणांनीं जीवनदानाची मोहीम उघडली. पण भूदानासारख्या यशासाठीं समाजव्यवस्थेच्या स्वरूपावर बहुतांशी अवलंबून असणाऱ्या चळवळीसाठीं जीवनदान देणें कितपत योग्य आहे ?

भूदानाचें तत्त्वज्ञान कांहीहि असो; पण त्याला आज मिळत असलेल्या, किंवा आजपर्यंत मिळालेल्या यशाचें कारण, ही चळवळ एका विशिष्ट परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर उभारलेली आहे, हें आहे हें विसरून चालणार नाहीं. भूदानाच्या उदयाला किंवा यशाला मुख्यत: खालील घटनांची पार्श्वभूमि कारणीभूत आहे.

( १ ) हिंदी स्वातंत्र्य-लढयांतील गांधींचें नेतृत्व; ( २ ) स्वातंत्र्योत्तर कालांत भारतांतल्या जवळजवळ सर्व काँग्रेस सरकारांचें 'कसेल त्याची जमीन' या कार्यक्रमाबाबतचें अप्रगत धोरण; ( ३ ) विनोबासारख्या संतांचें नेतृत्व; ( ४ ) या ना त्या कारणामुळें पक्षीय राजकारणाला कंटाळलेले कांहीं वजनदार राजकीय नेते; ( ५ ) भारतांतली अशिक्षित, भावनाप्रधान, आणि भाबडी जनता ( यशासाठीं शहरवासियांवर अवलंबून असणाऱ्या संपत्तिदान-यज्ञापेक्षां खेडुतांवर अवलंबून असणाऱ्या भूदानयज्ञाला मिळालेल्या भरघोस यशावरून ही गोष्ट सिद्ध होते ). ज्या ज्या वेळेला भूदान चळवळीच्या यशाचें मोजमाप आपण करूं इच्छितों तेव्हां तेव्हां या पार्श्वभूमीकडे दुर्लक्ष करून आपणाला चालणार नाहीं. भूदानाचें तत्त्वज्ञान हें नि:संशय सरळ आणि भाबडया मानवी मनाला उत्स्फूर्त आणि कार्यप्रवृत्त करणारें आहे याबद्दल शंकाच नाहीं. पण भूदानाचें यश– हें सरळ आणि भाबडें मानवी मन या एका विशिष्ट पार्श्वभूमीच्या भोंवऱ्यांत सांपडलें, आणि म्हणून तें उत्स्फूर्त आणि कार्यप्रवृत्त होऊं शकलें,– या गोष्टीवर आहे हेंहि विसरून चालणार नाहीं. तसें नसतें तर जमिनीसाठीं सरळ आणि भाबडया खेडुतांमध्यें चाललेल्या किंवा झालेल्या, तंट्यांना कांहीं अर्थच उरणार नाहीं. ( कारण प्रस्तुत लेखकाची अशी कल्पना आहे कीं 'हृदय परिवर्तन ' होण्याच्या अगोदर असे लोक ' दुष्ट ' नव्हते ). कोणत्याहि चळवळींच्या यशाचें श्रेय हें जितकें त्या चळवळीमागच्या तत्त्वज्ञानाला असतें, तितकेंच किंबहुना त्याहूनहि अधिक त्या विशिष्ट तत्त्वज्ञानाच्या उदयाला आणि वाढीला कारणी-








भूत असलेल्या पार्श्वभूमीला आणि अशा विशिष्ट पार्श्वभूमीवरील मानवी मनाच्या संवेदनक्षमतेला असतें. तत्त्वज्ञान हे अमर विचार असूं शकतात. व्यवहार हा अस्थिर आचार आहे. अमर विचारांचें संवर्धन हें अस्थिर आचाराच्या सुसंवादित्वावर अवलंबून असतें. अस्थिर व्यवहाराचें तत्कालीन स्वरूप हें त्याच्या पूर्वकालीन आणि समकालीन घटनांवर अवलंबून असतें. घटना या एका विशिष्ट तत्त्वज्ञानाला नेहमींच बांधलेल्या नसतात; किंबहुना एखाद्या विशिष्ट तत्त्वज्ञानाचें संवर्धन मात्र तत्कालीन घटनांच्या सुसंवादित्वावर अवलंबून असतें.

## जीवनदान व बुद्धिप्रामाण्य

भूदानासारख्या सामाजिक चळवळीसाठीं जीवनदान देणें अयोग्य आणि बुद्धिप्रामाण्यरहित आहे. याचें कारण म्हणजे भूदानाचें आंदोलन हें जरी तत्त्वज्ञानप्रेरित असलें तरी त्याच्या यशाचें गमक हें त्याच्या घटनाप्रणितत्वावर आहे. एका विशिष्ट सामाजिक परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर भूदानामागचें जीवनमूल्य आज कांहीं जणांना पहिल्या क्रमांकाचें वाटेल; पण तसें आज वाटलें म्हणून त्यामागील तत्त्वज्ञानासाठीं जीवनदान करणें हें भावनाप्रधानात्मकतेचें लक्षण आहे. बुद्धिवाद्याचें लक्षण नाहीं. भूदानाच्या यशासाठीं एका विशिष्ट प्रकारच्या सामाजिक परिस्थितीची नेहमीच आवश्यकता आहे. ज्या वेळेला तशाच प्रकारची सामाजिक परिस्थिति राहील त्यावेळीं भूदानाच्या चळवळीला यश मिळत राहील. आणि जीवनदात्यांच्या जीवनामध्यें अशा प्रकारचें यश मिळविणें हें पहिल्या क्रमांकाचें जीवनमूल्य ठरेलहि. पण बदलत्या परिस्थितीमध्यें भूदानासारख्या चळवळीचें यशहि अनिश्चित राहील, त्या मागची प्रेरणा कमी होईल — होणें अपरिहार्य आहे. आणि अशा वेळीं दुसऱ्याच एका सामाजिक अंगाला, त्या मागच्या तत्त्वज्ञानाला, भूदानामागच्या 'हृदयपरिवर्तनी' तत्त्वज्ञानापेक्षां जादा महत्त्व प्राप्त होईल. अशा वेळीं भूदानासाठीं जीवनदान दिलेल्यांना एकतर आपल्या जीवनदानामागच्या तत्त्वज्ञानाला, एका विशिष्ट अशा सामाजिक परिस्थितींत तें सांपडल्यामुळें, बदलत्या परिस्थितीनुसार मुरड तरी घालावी लागेल; किंवा दुराग्रहानें ( Dogmatically ) दुसऱ्याच एका जीवनमूल्याकडे स्व-मन ओढ घेत असतेवेळीं सुद्धां, पूर्वी एका ठराविक प्रकारच्या जीवनमूल्यासाठीं जीवनदान दिल्याची शपथ घेतलेली आहे या सबबीवर भूदानाचें काम करावें लागेल; करावें लागणें अपरिहार्य आहे. अपरिहार्य आहे याचें कारण असें कीं भूदानामागच्या तत्त्वज्ञानाचें जीवनमूल्य स्व-आयुष्यांत पहिल्या क्रमांकाचें असण्यासाठीं समाजाची सर्वसामान्य परिस्थितीहि विशिष्ट असावी लागते. पण ती इतिहासाच्या बदलत्या पानांतून नेहमी तशीच राहणें असंभवनीय आहे; किंबहुना अशक्य आहे. असा इतिहासाचा दाखला आहे. समाजाची सर्वसामान्य परिस्थिति ही बहुशः त्या समाजांतल्या राज्यकर्त्यांच्या धोरणावर, तत्कालीन आंतरराष्ट्रीय परिस्थितीवर, त्या समाजांत काम करणाऱ्या इतर राजकीय आणि सामाजिक संस्थांवर, आणि त्या समाजांतल्या व्यक्तींवर परिणामकारक असणाऱ्या तत्त्वज्ञानावर किंवा संस्कृतीवर अवलंबून असते. आणि म्हणूनच भूदानाच्या चळवळीचें यश, जीवनदात्यांच्या जीवनमूल्यांचें साकारत्व, हें ते जीवनदानी काय करतात याहि बरोबर, किंबहुना त्याहिपेक्षां अधिक प्रमाणांत वर नमूद केलेल्या घटना त्या समाजावर कशाप्रकारें परिणाम करतात यावर अवलंबून आहे; अवलंबून असणें अपरिहार्य आहे. आणि अशा या स्व-सामाजिक जग हें बाह्य परिणामात्मक असलेल्या, आणि म्हणून स्व-जीवनमूल्य हेंहि बाह्य परिणामात्मक असलेल्या, चळवळीसाठीं जीवनदान देणें अयोग्य व बुद्धिप्रामाण्यरहित होय.








डॉ. सरोजिनी बाबर

# लोकसाहित्यांतील साजशिणगार

मध्यंतरी मी अजिंठ्याचीं लेणीं पहायला गेलें होतें. त्यावेळीं खरें म्हणजे मला या लेण्यांतील शेंकडों वर्षांमागचीं रंगीत चित्रें पहायचीं होतीं; केवळ चित्रकलेचा एक जुना पण वाखाणलेला नमुना म्हणून. पण मीं जेव्हां हीं चित्रें एकामागून एक पहात गेलें तेव्हां मला प्रामुख्यानें असें दिसून आलें कीं, या चित्रांमध्यें जुन्या काळच्या स्त्रीचा साजशिणगार मोठ्या कौशल्यानें चित्रित झालेला आहे. आणि म्हणून मीं जेव्हां अगदीं बारकाईनें तो साजशिणगार पाहिला, तेव्हां मला दिसून आलें कीं, त्या वेळच्या बायका आजच्या मानानें निरनिराळ्या प्रकारची केशभूषा, वेषभूषा करीत असत. त्याचबरोबर निरनिराळ्या प्रकारचे कितीतरी दागिनेहि त्या घालीत असत ! पोषाखापेक्षां आणि केसांच्या विविध वळणांच्या पेक्षां त्यांच्या अंगावरील दागिने बघून मला घडीभर मोठें नवल वाटलें ! बायकांचा हा दागिने घालायचा सोस फार जुना आहे हें त्यावेळीं माझ्या लक्षांत आलें. म्हणून मी फावल्यावेळीं जुन्या वाङ्मयांत या दागिन्यांचा कुठें व किती पत्ता लागतो हें पाहूं लागलें.

## प्राचीन काळांतील दागिने

होतां होतां एक गोष्ट माझ्या नजरेंत प्रामुख्यानें भरली कीं, जुन्या काळीं दागिन्यांची नोंद त्या त्या वेळच्या वाङ्मयांत जरूर झाली आहे. कानामध्यें हिऱ्यांचीं कुडलें, गळयामध्यें रत्नांचे हार, दंडावर केयूर अगर अंगद, मनगटावर पोची व कडीं, कमरपट्टा, अंगठी, पायांत नूपुर, किंकिणी, तोरड्या, वाळे इत्यादि दागिन्यांचे प्रकार वेदकालीन स्त्री-जीवनामध्यें अमलबाचें वारंवार पहावयास मिळतें. श्रीमंत लोकांच्या मध्यें रत्नें आणि मोतीं यांचा वापर मोठ्या प्रमाणावर असे. तसेंच हिऱ्या-मोत्यांनीं जडविलेलीं त्यावेळचीं कर्णभूषणें हीं हालतीं डोलतीं अशीं असत.

रामायणामध्यें सीतेच्या अंगावरील दागिन्यांची नोंद लक्ष्मणाच्या तोंडी आलेल्या श्लोकामध्यें आली आहे. ह्या श्लोकाचा अर्थ असा आहे कीं, "सीतेचीं कानांतील कुंडलें व बाहूवरील केयूर माझ्या माहितीचे नाहींत. मी नुसतीं तिच्या पायांतील नूपुरें पाहिलीं आहेत; व त्याचें कारण असें आहे कीं, मला तिच्या पायांचें वंदन नित्य करावें लागे."

साधारणपणें आजपासून हजार दोन हजार वर्षांपूर्वीच्या काळामध्यें बायका कोणकोणत्या प्रकारचे दागिने घालीत असत याची कल्पना 'अमरादि' कोशावरून कांहींशी मिळते.

डोक्यावरील केसाच्या भांगामध्यें 'बालपाश्या' आणि 'पारितथ्या' या नांवाचे दागिने बायका त्या वेळीं घालीत असत. तसेंच कपाळावर लोंबणारे असे 'पत्रपाश्या' व 'ललाटिका' या नांवाचे दागिने घालण्याची पद्धति असे. आजच्या काळांत हे दागिने 'बिंदी' च्या रूपानें तग धरून आहेत असें म्हणतां येईल. खेड्यामध्यें 'पिंपळपान' नांवाचा दागिना घालायची अद्यापहि चाल आहे.

कानामध्यें घालावयाच्या दागिन्यांत 'कुंडलें' व 'कर्णिका' अगर 'तालपत्र' हीं येतात. कर्णिका ही कानाच्या वरच्या बाजूस घालीत असत. आज हा दागिना 'बुगडी' च्या रूपानें अस्तित्वांत आहे. 'कुंडलें' हीं खालीं लोंबतीं असत. पुरुषांचीं व स्त्रियांचीं कुंडलें वेगवेगळ्या प्रकारचीं असत. बाणाच्या कादंबरीमध्यें चांडालकन्येच्या वर्णनामध्यें वेगवेगळ्या








पद्धतीच्या कानांतील दागिन्यांची नोंद आलेली आहे. कुंडलामध्यें त्यावेळीं विविध प्रकारचीं रत्नें बसवीत, मोतींहि बसवीत आणि त्यांचे आकार पक्षी, मासे वगैरे-च्या सारखे असत! आजच्या काळांतहि या आकारा-च्या कर्णफुलांनीं पुन्हां डोकें वर काढलेलें दिसून येतें.

गळयांतील दागिन्यांना त्या वेळीं 'ग्रैवेयक' असें नांव होतें. तसेंच छातीवर रुळणाऱ्या हारास अगर माळेस 'ललंतिक' म्हणण्यांत येई. ही माळ जर सोन्याची असेल तर ती 'प्रालंबिका' या नांवानें ओळखिली जाई व मोत्यांची असेल तर तिला 'उरस्सू-त्रिका' म्हणत. हसळी ही देखील फार जुनीच आहे. कुणीं कुणीं कांहीं प्रकारच्या माळा डोक्यावरहि फुलांच्या वेणीप्रमाणें माळीत असत! जुन्या काव्य-ग्रंथांच्या मधून मोत्यांच्या हारांचे 'एकावलि' (एक पदरी), 'माणवक' (वीसपदरी), 'गुत्स' (बत्तीस पदरी), 'देवच्छंदक' (शंभर पदरी) इत्यादि अनेक प्रकार वर्णिलेले आहेत.

बायकांच्या हातांतील अंगठया मोहरांच्या (विशिष्ट नांवें कोरलेल्या) व रत्नांच्या असत. त्यांच्या कंबरपट्ट्याला मेखला, कांची, सप्तकी, रशना, रत्न-माला इत्यादि नांवें आहेत. कंबरपट्ट्याला जेवढे पदर असतील त्या मानानें हीं नांवें दिलीं जात. रत्नमालेमध्यें घुंगुरें बसवीत व बाई चालतांना त्यांचा मधुर किणकिणाट ऐकूं येई. कंबरपट्टा हा कमरेभोंवतीं घट्ट नसून बराच सैलहि असे. याची कल्पना लेण्यांतील चित्रांवरून येते. पायांतील व हातांतील इतर दागिन्यांचीहि कल्पना लेण्यांतील चित्रांवरून येते, 'केयूर', 'अंगद' हे दागिने अलिकडच्या बाजूबंदासारखे असून मनगटावरील दागिने 'वलय', 'कटक' अशा नांवानें ओळ-खले जात. वलयें रत्नखचितहि असत! 'कंकण' वलयाच्या खालीं घालण्यांत येई.

जुन्या काळचे हे लिखित साहित्यांत आलेले विविध प्रकारचे दागिने मराठींतील लोकसाहित्यामध्यें, विशेषतः लोकगीतांच्या मध्यें, मोठया कौशल्यानें गुंफलेले आढळून येतात. मात्र बदलत्या काळाप्रमाणें त्यांचीं नांवें देखील बदललेलीं दिसून येतील.

**लोकगीतांतील उल्लेख**

पूर्वी अशी एक चाल खेड्यापाड्यांमधून आढ-ळून यायची कीं, एखाद्या बहिणीच्या मुलीला ह्या बहिणीच्या मामानें बहिणीबरोबरच माहेर करावयाचें. म्हणजे कपडालत्ता व दागदागिने यासंबंधींची आपल्या ऐपतीप्रमाणें हौस भागवावयाची. अर्थात् हें सर्व हा भाऊ एकत्र कुटुंबांतील इतर कुटुंबियांच्या व विशे-षतः आपल्या आईवडिलांच्या भावना ओळखून त्यांच्या सुखासाठीं करीत असे. त्यामुळें भावालाहि आनंद होत असे आणि तें स्वाभाविकहि आहे. अशा प्रकारची हौस वा कौतुक दर्शविणारें एक लोकगीत सांपडतें तें असें आहे—

बाळे मी जातें बाजारीं    ऐक ग माझी गोष्ट
नेसलें काळी चंद्रकळा    तिला ग रेशमी कांठ
अंगांत चोळी भिंगाची    बसली ग तटतट
दंडांत बाजूबंदाची    गोड ग लटपट
गळयांत मणी डोरलं    आणिक काळी पोत
कानांत बाळया बुगडया    नाजुक मोत्याचे काप
हातांत गोट पाटल्या    कंगण्या भरल्या दाट
कमरचा मासपट्टा    करतूया मनांतला बेत
पायांत पैंजण घुंगुरांचं    दाट हाईती घस
बोटांत जोडवीं मासूळया    बिरुद्याच ठस
भांग भरला मोतीयानं    कपाळ भरलं कुंकवानं
नेत्र भरल काजळानं    नाक भरलं नथीनं
मुख भरलं तांबूलानं    भरला ग कान फुलानं
गळा भरला गळसुरीनं    दंड भरल बाजुबंदानं
हात भरल बांगड्यानं    कंबर भरली दाबानं
पाय भरलं पैंजणानं    बोटं भरलीं जोडव्यानं
वटी भरली तांदळानं    केलं ग म्हायार मावळयानं

या गाण्यामध्यें दागिन्यांच्या जोडीलाच स्त्रियांच्या अंगावरील इतर साज-शिणगारहि आलेला आहे. काळी चंद्रकळा, भिंगाची चोळी, काजळ, पान खाणें इत्यादि प्रकारच्या दागिन्यांखेरीज आलेल्या बाह्य





अनुक्रमणिका

सजावटीची कल्पना इथें आली आहे. त्याचप्रमाणें दंडांतील बाजूबंद, हातांतील बांगड्या, गळयांतील मणी, डोरलें, काळी पोत, गळसरी; पायांतील पैंजण, जोडवीं, बिरुदीं, मासोळया; मनगटावरील गोट-पाटल्या, कंगण्या; भांगांतील मोत्यांचा सर, नाकांतील नथ, कानांतील बाळया-बुगड्या, मोत्यांचे काप, फुलें; कमरेचा मासपट्टा, दाब इत्यादि दागिनेहि इथें आलेले आहेत.

सूर्या समूक माजं घर ग बाई मी लोटितें घरदार
पायीं साकळया तंगभार ग बोटीं जोडवीं झिनकार
कमरीं दाबाला चारी कुलपं ग गळीं पुतळियाची माळ
वर चितांक नक्षीदार ग डाळी डोरलं पांच फयार
नथ नाकांत डौलदार ग काप कानांत गजबार
डोकी केवडा मारी ल्हार ग चोळी अंगांत हिरवीगार
नेशी पिंवळा पितांबर ग हातीं सोन्याचा बिलवार
मी ग निघाले न्हवयीना ग लेक बाबांची तालीवार

आसपासच्या चार घरांमध्यें आपलें घर कसें उठून दिसतें आहे 'सूर्या समूक माजं घर' या एका ओळींत कल्पना देऊन, या गीतांतील मुलीनें इथें आपल्या अंगावरील दागिन्यांची माहिती सांगितली आहे. इथें पायांतील तंगभार साखळया, बोटांतील झंकार करणारीं जोडवीं; कमरेचा चार कुलपें असलेला दाब; गळयांतील पुतळयांची माळ, नक्षीदार चितांक, पांच फेरांचें डाळीचें डोरलें; नाकांतील डौलदार नथ, कानांतील भरघोस काप; हातांतील सोन्याचे बिलवर, डोक्यावर घातलेला सोन्याचा राकडी केवडा इत्यादि दागिन्यांची नोंद झालेली आहे. पूर्वीच्या काळीं मुलींचीं लहान वयांत लग्नें होत असल्याकारणानें तिच्या अंगावर सणासुदीच्यावेळीं काय काय दागिने असत याची यावरून कल्पना येते. या गीतांत असे दागिने घातलेल्या मुलीला 'तालीवार' म्हणजे श्रीमंताची असें म्हटलें आहे. ताले म्हणजे दैव. तालेवार म्हणजे दैववान् , वैभवशाली.

मुक्ताचं चांगुलपन, जसं केवड्याचं पान
बाळया बुगड्यांनीं, भरल कान कापाला सोडवान
काप घेतील विकयीत, नाकीं सुरूच्याची नथ
नथीबाईला आरली ग, काळया पोतीला डोरलीं
डोरल्याखालीं सरी लोळ, पडला सरीला ग पीळ
बाजूबंद लेली येळां (वाक्या), बाजुबंदाचं आऊथीट
सई लेली चारी गोट, अंगठ्यांनीं भरलीं बोटं
पायीं पैंजण वाजयीतीं, बोटीं जोडवीं झिनकारीतीं

या गीतामध्यें मुक्ता नांवाची एक प्रातिनिधिक स्त्री आली असून केवड्याच्या पानाप्रमाणें तिचा चांगुलपणा देखणा असल्याचें म्हटलें आहे. या चांगुलपणामुळें तिला मिळालेल्या दागिन्यांचीहि मोठया खुबीनें इथें मांडणी झालेली आहे. कानांतील बाळया, बुगड्या, काप, नाकांतील सूर्यासारखी गोल नथ, नथीला लावलेलीं आरलीं; काळया पोतीचीं डोरलीं, गळयांतील सरी; दंडावरील वाक्या व बाजूबंद, हातांतील चारी गोट, बोटांतील अंगठया, पायांतील पैंजण, बोटांतील जोडवीं इत्यादि दागिने या गीतांत गोविलेले आहेत. त्याचबरोबर इथें घरचे बाकीचे दागिने असतांना काप तेवढे नव्यानें विकत घेतल्याचेंहि मुद्दाम सांगितलेलें आहे. बायकांचा दागिने घालण्याचा सोस चारचौघींचे दागिने बघून कसा वाढता असतो, त्याची कल्पना इथें स्पष्ट झालेली आहे.

या हो या रुक्मिणी आमुच्या या आळीं
हिऱ्या मोराची बाई तुमची काचोळीं
हिऱ्या मोरावरनं गांवा गेला हरी
गांवा गेला हरी बाई वसली पंढरी
पंढरपूरचा बाई दामाजी सोनार
त्यानं घडविला बाई जोडव्यांचा जोड
एका जोडव्याला साडेतीनशें मोतीं
न्हाई रुक्मिणीचा बाई पांडुरंग पति

पंढरपूरच्या विठ्ठलाची रुक्मिणी हिऱ्या मोहरांची चोळी अंगांत घालीत असल्याची व त्यासाठीं तिचें व विठ्ठलाचें भांडण होऊन तो गांवीं निघून गेल्याची कल्पना या लहानग्या गाण्यांत आली आहे. पंढरपूरच्या दामाजी सोनारानें रुक्मिणीच्या एका जोडव्याला साडेतीनशें मोती घडविल्याची अद्‌भुत








किमयाहि या गीतांत प्रकट झाली आहे. देवाच्या राणीला देखील कशा प्रकारचें वैभव हवें असें हें यावरून दिसून येतें.

सई सई गोविंदा येतो
मजवरि गुलाल फेंकीतो
तुझ्या बाई गुलालाचा भार
आमच्या वेण्या झाल्या लाल
आमच्या वेण्या मोकळया
सोनीयाच्या साखळया
घडव घडव रे सोनारा
माणिकमोतीं बिजवरा
बिजवराला खिडक्या
आम्ही लेकी लाडक्या
लाड सांगूं बापाला
मोतीं मागूं कापाला

जुन्या काळच्या लाडक्या लेकीचे वडिलांचे कडून कसे लाड पुरविले जात असत याची कल्पना या झिम्म्याच्या गीतावरून येते. या गीतांत कृष्णाच्या बालक्रीडेचें वर्णन आहे. आणि त्याच्याबरोबर खेळणाऱ्या छोटया मुलींच्या वेण्या सोन्याच्या आहेत असें म्हटलें आहे. इथें ही वेणी सोन्याची आहे म्हणजे पाठींवर लोळणाऱ्या केसाच्या वेणींत विविध प्रकारचीं सुवर्णफुलें गुंफिलीं आहेत असा आशय आहे. कपाळावर लोंबणाऱ्या बिजवराला–बिंदीला–चंद्रकोरीला माणीक-मोतीं जडवून नक्षी तयार झाली आहे असें सांगतांना वडील कसे लाड पुरवीत हेंहि सूचित केलें आहे. कानावरील कापाला वडिलांचेकडून मोतीं मागून घेण्याची आवश्यकताहि या ठिकाणीं व्यक्त झालेली आहे.

पंचीम आली बुधवारीं पूस नक्षीत्रावरी
देवई नातू झाला वसुदेव आनंदला
चोपुनी केली भुई चवरंग त्या ठाईं
वर बसवूं रुखमाबाई पंचमी ग येग बाई
केळीचेग रवले खांब मधीं आला जीग डांब
कुरळे केस विंचरीती नारी वेनी गुंफित्याती
वेनीयीचा साज झाला पिवळया नागायाची मूद
हारपाळ खेडी पुतळी कारवत खेडी कोयाळी
कोथिंबीर मेन बाळी पंचमी बुधवारी आली

पंचमीच्या या गाण्यामध्यें या सणाच्या वेळीं वेणीमध्यें किती प्रकारचे सोन्याचे दागिने घालीत असत त्याची माहिती आलेली आहे. या दागिन्यांची कल्पना पिवळया नागाची मूद, पुतळी, कोयाळी वगैरे शब्दांनीं दिलेली आहे. पूर्वीच्या काळीं वेणीचा खोपा घालावयाची जी चाल होती त्यासाठीं त्या खोप्यांत घालावयाचे हे दागिने जरूर करण्यांत येत असत. या गाण्यांत पंचमीच्या जोडीलाच घरांत नातू झाल्यानें होणारा आनंदहि प्रकट झालेला आहे. तेव्हां त्या नातवाच्या बारशाच्या निमित्तानें हा साजशिणगार झालेला दिसून येतो.

नार लेणं लेती वीस पुतळया बोरमाळ
माजा ग बाळराज बाई आणितो चंद्रहार
लाडके माजी बाळ नको निजूस भुईला
चिमणे राजूबाई गोंडा राक गडुईला
माळीन सादवीना दैंटासकट कारलं
मायबापांनीं ग दिलं कोल्हापुरी डोरलं

या निरनिराळया विषयावरील ओव्यांमध्यें पुतळया, बोरमाळ, चंद्रहार, वेणींतील सोन्याचा अगर चांदीचा गोंडा व कोल्हापुरी साजाचें मंगळसूत्र हे दागिने आले आहेत. अशा कितीक ओव्यांच्या मधून वरील गाण्यांत आलेल्या दागिन्यांची माहिती कारणपरत्वें आलेली आहे असें दिसून येईल. त्याच प्रमाणें सोन्याची सुंपली व तिला मोत्यांनीं केलेली गुंफण, सोन्याचा चेंडू व मोत्यांचा दांडू, मोत्यांची चुंबळ व सोन्याची घागर अशा प्रकारचा उल्लेखहि मुलांच्या खेळण्यासाठीं दागिनेवजा म्हणून अनेक लोकगीतांच्या मधून आलेला आढळून येतो. " नाच ग घुमा– " या गाण्यामध्यें बारा बैती जमा होऊन शेतकऱ्याच्या मुलाला आवश्यक असणाऱ्या वाळा, मुदीसारखे दागिने व खेळांचीं साधनें पुरवीत असल्याचा उल्लेख आलेला आहे. तसेंच



अनुक्रमणिका






" सासरच्या वाटे, कुचकुच कांटे– ' या गीतामध्यें स्त्रियांच्या अंगावरील वर दिलेल्या गीतांतील दागिने गोंविले आहेत असें आढळून येतें.

" रत्नजडित पिंपळपान शोभतें भाळीं ।
नयनाच्या कोरां काजळ घाली ।
दंडीं बाजूबंद मुद्रिका करीं ।
पायींचे तोडे पैंजण वरी ।
वाळयाचा नाद उमटतो दारीं ।
सोन्याचा दाब कमरेच्या वरी ।
मोत्यांची कंठी त्यावर सरी ।
यशोदा बसली मंचकावरी ।
नांव ठेवीलं परब्रम्ह हरी ।
जो बाळा जोजो रे जो ॥ "

" मथुरेमध्यें अवतार झाला– " या कृष्णाच्या जुन्या पाळण्यामध्यें असलेलें हें वरील कडवें पिंपळपान, पैंजण, वाळे, दाब, मोत्यांची कंठी, सरी, मुद्रिका, बाजूबंद इत्यादि दागिन्यांची माहिती देत आहे. बारशाचे वेळीं मुलाच्या व मुलाच्या आईच्या अंगावर पूर्वी कोणत्या प्रकारचे दागिने घालीत हे यावरून दिसून येतें. त्याचप्रमाणें ते किती मौल्यवान असत याचीहि यावरून माहिती मिळते.

दागिन्यांची या प्रकारची नोंद अशी अनेक लोकगीतांच्यामधून झालेली दिसून येईल. आणि ही नोंद पारखीत असतांना एक गोष्ट प्रामुख्यानें लक्षांत येईल ती अशी कीं, प्रत्येक गाण्यामध्यें त्याच त्या दागिन्यांची पुनरावृत्ति झालेली असली तरी बहुधा एक तरी नवा दागिना प्रत्येक गाण्यानें नव्यानें सांगितलेला आहे.

**उखाणे**

" पाऊस येतो झिरीमिरी, भिंती झाल्या ओल्या भिंती झाल्या ओल्या; सोनाराच्या पोरीच्या लांब बिगबाळया. "

" तुझ्या घरीं माझ्या घरीं, आहे बिंदली सरी आहे बिंदली सरी; फुगडी खेळतांना बाई नको तालीवारी. "

" नको गोट, नको तोडे, नको मोतीं माणीक ××× रावांच्या जीवापेक्षां कांहीं नको आणीक. "

" गळा भरला ठुशीनं, हात भरला छंदानं ××× रावांचं नांव घेतें सर्वांच्या खुशीनं. "

" चांदीचं कारलं सोनारानं घडीवलं ××× रावांच्या नांवासाठीं तुम्ही मला अडीवलं "

"मागं पुढं गोटपाटल्या मधें भरतें केरवा ××× रावांनीं मुंबईहून शालू आणला हिरवा. "

" हिरवा पाचू चमकतो तांदूळपोतींत ××× रावांचं नांव घेतें त्यांच्याच मंडळीत. "

फुगडीच्या व नवऱ्याचें नांव घ्यावयाच्या या उखाण्यांत बिगबाळया, सरी, बिंदली, गोट, तोडे, ठुशी, छंद, कारलं, केरवा, पाटल्या, हिरव्या पांचूची तांदूळपोत इत्यादि दागिने आलेले आहेत. अशाप्रकारें लक्षांत येतील त्या सर्व दागिन्यांची नोंद या पद्धतीच्या उखाण्यांमधून झालेली दिसून येईल.

तसेंच पुष्कळशा कथात्मक लोकगीतांमधून व लोककथांमधून गळयांतील " नवलाखी हाराचा " वारंवार आलेला उल्लेखहि जरूर पाहण्यासारखा आहे.

लोकसाहित्यामधील बाह्यांग सजविण्याच्या स्त्रियांच्या हौसेची माहिती ही याप्रकारें या साहित्यामध्यें सांपडते. यापेक्षाहि वेगळा श्रृंगार काळी चंद्रकळा नेसणें, भिगाची चोळी घालणें, डोळयांत काजळ घालणें, पान खाणें या प्रकारेंहि लोकगीतांच्यामधून आल्याचा उल्लेख मागें आला आहेच.

**सोळा श्रृंगार**

" सध्यां बहुतेक जुन्या व फारसा विचार न करणाऱ्या स्त्रिया तऱ्हेतऱ्हेचे दागिने अंगावर घातल्यानें आपणास श्रृंगारलेली व सुंदर मानितात. परंतु ज्या खरोखरी पतिव्रता व सुज्ञ स्त्रिया आहेत त्या केवळ सोन्या-चांदीचे दागिन्यास श्रृंगार मानीत नाहींत. कारण हे श्रृंगार नसून सोयऱ्याधायऱ्यांस व इष्टमित्रिणींस मत्सरास, द्वेषास व दुःखास कारण होणारे आहेत. हें वीख आहे. या करितां या बाहेरील दिखाऊ श्रृंगारास न भुलतां योग्य ते धारण












करावेत हें प्रत्येक स्त्रीचें कर्तव्य होय. "

" सर्व-गीत-सारसंग्रहा"मध्यें सांगितलेली ही कल्पना लक्षांत घेतां बायका जे दागिने घालतात ते इतरांच्या समोर आपलें वैभव प्रकट करण्यासाठीं घालतात हें कटुसत्य नजरेआड करून चालणार नाहीं. स्वत:चें सौंदर्य वाढवीत असतांनाच स्वत:चा रुबाब वाढविण्याचाहि हेतु या दागिने घालण्याच्या बुडाशीं आहे ही वस्तुस्थिति असली तरी स्त्रियांना त्याची आवड फार असते हेंहि तितकेंच खरें आहे. त्या खेरीज अगदीं पुरातन काळापासून दागिन्यांच्या बद्दलची नोंद वाङ्मयांत होती.

स्त्रियांच्या दागिन्यांखेरीजच्या खऱ्याखुऱ्या साजशिणगाराची कल्पना पूर्वीच्या लोकांनीं कल्पिलेल्या सोळा प्रकारच्या श्रृंगारावरूनहि येते. यांपैकी बरेच श्रृंगार सर्व थरांतील स्त्रियांना करतां येण्याजोगे आहेत. श्रीमंत व गरीब हा भेद या श्रृंगाराच्या आड येऊं शकत नाहीं. हे सोळा श्रृंगार असे आहेत—

( १ ) चोळी अंगाबरोबर घालणें, ( २ ) योग्य व बेताचे दागिने घालणें. ( ३ ) लुगडें व्यवस्थित नेसणें. ( ४ ) गजगति असणें. ( ५ ) हरिणाक्षी असणें. ( ६ ) वेणी-फणी नित्य करणें. ( ७ ) सुवासिक फुलें माळणें. ( ८ ) डोळयांत काजळ घालणें. (९) कुंकू कपाळीं लावणें. (१०) सडपातळ असणें. (११) गौरवर्ण असणें. (१२) थोडी निद्रा घेणें. ( १३ ) हंसतमुख असणें. ( १४ ) मधुर भाषण करणें. ( १५ ) हात राखून खर्च करणें. ( १६ ) आदरातिथ्य करणें.

याखेरीज जुन्या काळच्या लोकांनीं ह्या बाह्य शृंगाराच्या जोडीलाच अंतरशृंगाराचीहि यादी दिलेली आहे. त्यांच्या मतें:—

"दया, क्षमा, शांति, प्रीति, नीति, भक्ति, चातुर्य, धैर्य, पातिव्रत्य, परोपकार, मनमिळावूपणा, समाधान, सत्यवचन, नम्रता, सहिष्णुता, ज्ञानलालसा " हे सर्व अंतरशृंगार आहेत.

## आजची गरज

माझ्या कल्पनेप्रमाणें आजच्या स्त्रीच्या अंगीं या दोन्ही प्रकारच्या शृंगाराची आवश्यकता जरूर आहे. एक तर आजचा काळ बदलला आहे व त्यामुळें अगदीं जुन्या काळच्या स्त्रीप्रमाणें मोतीं पोवळयांनीं ओटी भरण्याचे दिवस गेले आहेत; आणि दुसरें असें कीं, स्त्रिया वाढत्या प्रमाणांत शिक्षण घेऊं लागल्यानें आजच्या सुधारलेल्या जगामध्यें धातूंच्या दागिन्यापेक्षां बुद्धीची चमक दाखविल्यानेंच स्त्रियांच्या सौंदर्यामध्यें खरी भर पडणार आहे. तथापि ज्याच्या त्याच्या स्वभावधर्माप्रमाणें हा नवा साजशिणगार राहील. सर्व स्त्रियांना एक असा विचार त्यामागें राहीलच असें नाहीं. एखादी बाई जर धार्मिक मनोवृत्तीची असेल तर ती आपले दागिने एका जुन्या अभंगांत सांगितल्याप्रमाणें असे वर्णन करून दाखवील.

" चिदंबर नाम सौभाग्य संपूर्ण ।
सकल आभरण नाम तुझें ॥
पांडुरंग नाम कंचुकी मी ल्यालें ।
पीतांबर नेसलें रामनाम ॥
केशवाचें नाम प्रकट मंगळसूत्र ।
पुतळयांचा हार नारायण ॥
माधवाचें नाम पदक जडित ।
गोविंद ताईत मोतीं माळा ॥
विष्णु तुझें नाम मोत्याचा कठाण ।
सरी मधुसूदन जंबुमाळा ॥ "

आणि मग प्रत्येकीच्या मनोवृत्तीप्रमाणें दागिन्यांचा थाटहि वेगवेगळा राहील. अर्थात् हा फरक मध्यम वर्गीय व सुशिक्षित स्त्रीमध्यें आढळून येईल. सर्वसामान्य स्त्रीची दागिन्यांची भावना आजच्या काळांतहि:—

पाटीवर डाग ग बाई कोनाची नार लेली
बंदुची माज्या रानी सई देवकाला गेली

कांहीं काळपर्यंत तरी अशीच राहील. आणि त्याला इलाज नाहीं.







आचार्य मो. वा. दोंदे

# अस्पृश्यतेचा बळी – डॉ. बाबासाहेब आंबेडकर

## हुतात्म्याचें जीवन

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचें देहावसान गुरुवार ता. ६ डिसेंबर १९५६ रोजीं झालें. भारतीय सार्वजनिक जीवनांतील एक सामर्थ्यशाली व्यक्ति नाहींशी झाली. डॉ. बाबासाहेबांना सार्वजनिक जीवनांमध्यें मित्रांपेक्षां शत्रु जास्त होते परंतु ते सुद्धां हळहळले. डॉक्टरसाहेबांच्या विद्वत्तेचा व चारित्र्याचा गेली पंचवीस-तीस वर्षें एक मोठा दरारा उत्पन्न झालेला होता, धाक निर्माण झालेला होता. भारतामध्यें लोकशाहीचें रोपटें नुकतेंच रुजूं घातलेलें आहे, अशा काळांत डॉक्टरसाहेबांच्या सारख्या व्यक्तिमत्त्वाच्या विद्वानाची आवश्यकता होती; त्यामुळें त्यांचें निधन म्हणजे एक मोठी राष्ट्रीय आपत्तीच म्हटली पाहिजे.

डॉ. आंबेडकरांचें सर्व आयुष्य म्हणजे एका हुतात्म्याचें जीवन आहे. धार्मिक आणि सामाजिक छळाची ती परमावधीच होय.

## कबीरपंथी कुटुंब

रत्नागिरी जिल्ह्यांतील मंडनगड जवळच्या अंबवडे नांवाच्या खेड्यामध्यें राहणारें हें कुटुंब. डॉक्टरसाहेबांचे आजोबा मालोजी सकपाळ. त्या खेड्यांतील देवाची पालखी सांभाळण्याचा मान या कुटुंबाकडे होता मालोजीचा मुलगा रामजी व मुलगी मीरा. मालोजींचें घराणें कबीरपंथी. कबीरपंथ जातिभेद मानीत नाहीं. रामजी सकपाळ यांना चौदा मुलें झालीं. चौदावें रत्न भीमराव ऊर्फ डॉ. बाबासाहेब आंबेडकर. मातोश्रींचें नांव भीमाबाई. बाबासाहेबांचे वडील व सात चुलते लष्करांत सुभेदार-मेजरपर्यंत गेले होते. सर्वच जण कबीरपंथी.

भीमराव सहा वर्षांचे असतांना त्यांची मातोश्री वारली. पुढें आत्यानें त्यांना वाढविलें. बाबांचें आत्यावर भारी प्रेम. आत्याच्या प्रेमळपणाच्या ते नेहमीं मोठ्या मजेदार गोष्टी सांगत असत. रामजी सुभेदार मेजर होते तरी लष्करांतील शिपायासाठीं असलेल्या ट्रेनिंग स्कूलमध्यें ते चौदा वर्षें शिक्षक होते. रामजीना थोडें इंग्रजी यायचें. परंतु गणित व मराठी ते उत्तम रीतीनें शिकवीत. त्यांचें जीवन मोठें सात्त्विकतेचें होतें. मद्यपान-धूम्रपान बिलकूल नाहीं. क्रिकेट, फूटबॉल खेळांमध्यें ते प्रवीण होते. त्यांचा आणि महात्मा ज्योतिबा फुल्यांचा मोठा परिचय. ज्योतिबांच्याबद्दल त्यांना मोठी भक्ति वाटत असे.

## झुंझारपणाचा वारसा

१८९२ सालीं इंग्रज सरकारनें लष्करामध्यें महारजातीची भरती बंद केली. रामजीनें त्यासाठीं मोठी चळवळ केली. न्यायमूर्ती रानडयांच्या जवळून कैफियत तयार करून घेतली व मुंबईच्या गव्हर्नर साहेबांची त्या बाबतींत मुलाखतसुद्धां घेतली. बाबासाहेबांना जो झुंझारपणाचा वारसा मिळाला, तो त्यांच्या वडिलांच्याकडूनच मिळाला, असें म्हणायला हरकत नाहीं. रामजी सेवानिवृत्त झाले, तेव्हां बाबासाहेब दोन वर्षांचे होते. पुढें तें कुटुंब दापोलीस आलें.

## पहिला धक्का

बाबासाहेब वयाच्या पांचव्या वर्षीं शाळेंत गेले. सातारा येथें त्यांचें कांहीं शिक्षण झालें. ते एकदां गोरेगांव येथें चालले होते. बरोबर भाऊ होता. स्टेशन मास्तरच्या रदबदलीनें एक खटारा मिळाला. वाटेंत खटारावाल्याला कळलें कीं हीं पोरें महाराचीं आहेत. खटारा विटाळला, म्हणून या दोघां बाळांना गाडीवाल्यानें झोडपून काढलें बाबानें त्याला काकुळतीनें विनंति केली. दुप्पट भाडें कबूल केलें. पण गाडीवाला त्यांच्याबरोबर गाडींत बसेना. गाडी या पोरांनीं हांकली. आणि गाडीवाला पायीं चालला रात्रभर पोरांना झोंप नाहीं. पाण्यासाठीं तळमळले, पण कोठें पाण्याचा थेंबहि मिळेना. भीमराव एका रस्त्यावरच्या नळावर चोरून पाणी प्याले. परंतु त्यांच्यावर तावडतोब मार पडला !












आपण अस्पृश्य आहोंत हिंदुसमाजांत आपल्याला कोणी शिवायला तयार नाहीं, पाणीसुद्धां प्यायला द्यायला तयार नाहीं ! असा काय आम्हीं या हिंदूंचा आणि हिंदु धर्माचा गुन्हा केला ! हाच पहिला धक्का ! छोट्या बाबांचा स्वाभिमानी आत्मा त्याच वेळेपासून जागा झाला, बोलूं लागला.

पुढील अनुभव त्याहूनहि भयंकर. या पोरांची हजामत करण्याचें न्हाव्यानें नाकारलें. बहिणीनें भावाचे केंस कापले ! अरेरे ! !

शाळेंत येतांना भीमराव एकदां चिंब भिजला. पेंडसे मास्तरानें घरीं पाठविलें. स्वतः कपडे दिले. पण नुसती लंगोटी ! वर्गांत नुसत्या लंगोटीनें येऊन बसले. शरम वाटली ! ओक्साबोक्सी रडूं लागले. पावसांत भिजले होते. कां ? तर इतर मुलें महाराचा पोर म्हणून कोणी छत्रीमध्यें घेईनात ! बाबांना काय वाटलें असेल ?

शाळेंमध्यें भीमराव वर्गांत एका कोपऱ्यांत किंवा बाहेरच्या पायरीवर फाटक्या-तुटक्या गोणपाटाच्या तुकड्यावर बसायचें ! शिक्षक प्रश्न विचारायचे नाहींत ! कविता म्हणायला सांगायचे नाहींत ! त्यांच्या चोपड्यांना शिवायचे नाहींत ! तहान लागली तर तोंडामध्यें वरून पाणी ओतायचें ! बाबासाहेब ! तुमच्या कोवळ्या बालमनाला काय वाटलें असेल !

### अद्‌भुत घटना

याच सुमारास एक अद्‌भुत घटना घडली. बाबासाहेबांचें शाळेंतील रजिस्टरामध्यें नांव आंबवडेकर सकपाळ. त्यांचे एक मास्तर होते. ते ब्राह्मण होते. त्यांचें नांव होतें 'आंबेडकर', त्यांचा भीमरावबर मोठा लोभ. ते नेहमीं म्हणायचे. "कायरे भीमराव ! तुझें नांव केवढेंरे लांबलचक ! 'आंबवडेकर सकपाळ' ! तूं असें कर, माझें नांव घे. 'आंबवडेकर–सकपाळ' याऐवजीं मी तुझें नांव 'आंबेडकर' असें लिहीत जाईन." भीमरावनें कबूल केलें. तेव्हांपासून छोटा भीमराव, भीमराव आंबेडकर झाले ! अहाहा ! केवढी अद्‌भुत घटना ही ! आपल्या गुरुजींचें नांव धारण करून, पुढें त्या नांवानें जगविख्यात कीर्ति मिळविली. गुरुजी जातीनें ब्राह्मण ! ज्या हिंदुधर्मानें त्यांचा बालवयापासून छळ चालविला होता, त्याच हिंदुधर्मांतल्या ब्राह्मणाचें नांव ! जगामध्यें अशी अद्‌भुत घटना कोठें सांपडेल काय ?

### कृतज्ञतेचे प्रश्न

आंबेडकर या ब्राह्मण मास्तरांचें भीमरावबर मोठें प्रेम ! आपल्यांतलें जेवणसुद्धां भीमरावला द्यायचें ! केवढी थोर व्यक्ति ही ! बाबासाहेब पुढें मोठे झाले. पहिल्या 'राउंड टेबल' परिषदेला ज्या वेळेस बाबासाहेब निघाले, त्या वेळेला खेड्यामध्यें राहात असलेल्या या वृद्ध शिक्षकांनीं बाबासाहेबांना आशीर्वादाचें आणि अभिनंदनाचें पत्र पाठविलें. तें पत्र पाहून बाबासाहेबांचें हृदय भरून आलें. डोळ्यामधून कृतज्ञतेचे अश्रु घळघळा गळूं लागले. मी तें हृद्य दृश्य कधींहि विसरणार नाहीं ! शेवटपर्यंत तें पत्र बाबासाहेबांनीं जोमाळून ठेवलें होतें. अहाहा ! साध्याभोळ्या परंतु ममतेच्या त्या कुबेराला आपल्या भीमराव आंबेडकराबद्दल काय वाटलें असेल याची एखाद्या महाकवीला तरी कल्पना करतां येईल काय ?

### बागेचा षोक

लहानपणीं बाबासाहेबांना बागेची मोठी आवड. शाळेपेक्षां आणि पाटी-पुस्तकापेक्षां झाडा-पानांची फार हौस. कोणाच्या तरी बकऱ्या-मेंढ्या राखायचे. स्टेशनवर चार बोजे उतरून हमालाचें काम करायचे. दोन चार आणे मिळाले की त्याचीं झाडें विकत घ्यायचे. एवढा बागेचा षोक.

त्यांना मुंबईला जाण्याची इच्छा झाली. कारण मुंबईमध्यें गिरणींत चांगली नोकरी मिळते. पैसेहि चांगले मिळतात. पण मुंबईला जायचें कसें ? पैसे कोठून आणायचे ? आत्याच्या बटव्यामधून थोडे पैसे काढून घ्यावेत, व मुंबईला सूं-बाल्या करावा. तीन-चार वेळां प्रयत्न करून पाहिला. परंतु बटवा कांहीं हाताला लागेना. एकदाचा सांपडला. परंतु त्यांत निघाले अवघे दोन पैसे ! शरम वाटली ! आपण काय करतों आहोंत हें ? छट् ! असें अपकृत्य आपल्या हांतून कदापि होतां कामा नये !

### 'अभ्यासू' जागा झाला

बाबासाहेबांच्या जीवनाला वळण देणारी ही एक मोठी घटना ! कांहीं नाहीं ! आपण शिकायला पाहिजे. अभ्यास करायला पाहिजे. उत्तम अभ्यास करायला पाहिजे. विद्या शिकल्याशिवाय पोट कसें भरतां येणार ? बाबासाहेबांच्या मधला 'अभ्यासू विद्यार्थी' प्रथम त्याच वेळीं जागा झाला, यांत शंका नाहीं.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

पुढें आंबेडकर मंडळी मुंबईला आली. लोअरपरेल येथील दबक-चाळींत राहिले. गिरगांवांतील मराठा-हायस्कूलमध्यें भीमराव आंबेडकरांचें नांव घातलें. भीमरावांच्या मनांत वाचनाची अनावर आवड उत्पन्न झाली. वडील कर्ज काढून आपल्या मुलाला पुस्तकें आणून द्यायचे. भीमरावानें मोठ्या खटपटीनें व वशिल्यानें 'एल्फिन्स्टन' हायस्कुलांत प्रवेश मिळविला. त्यावेळीं ते परळला राहायला आले होते. सर्व संसार एका खोलींत. भांडीं, बिछाना, चूल, जळवण, कोंबड्या, बकऱ्या–सर्व एकाच खोलींत. कसला अभ्यास होणार! रात्रीं लवकर झोंपायचें, व दोन वाजतां उठून अभ्यास करायचा, पांच वाजतां नळावर आंघोळ करायची आणि धोबी तलावावरील एल्फिन्स्टन हायस्कुलला जायला पायीं निघायचें! कोर्टामध्यें कामाला जाणारा एक शिपाई जातां जातां भाकर नेऊन द्यायचा!

## एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें

एल्फिन्स्टन हायस्कूल म्हणजे इलाख्यांतील मोठ्यांतली मोठी सरकारी शाळा. अशा ठिकाणीं सुद्धां प्रवेश मिळवितांना अस्पृश्यता आडवी आली होती. शाळेमध्यें तरी त्यांना कशा रीतीची वागणूक देण्यांत येत असे? शेवटच्या बांकावर बसायचें. फळ्याजवळ जायचें नाहीं. फळ्याला शिवायच नाहीं. कारण फळ्याच्या पाठीमागें इतर मुलांचे जेवणाचे डबे अडकवून ठेवलेले असायचे. नाहीं म्हणायला प्रसिद्ध मजूर पुढारी कै. श्री. एन्. एम्. जोशी यांनीं मात्र भूमितीच्या तासाला हट्टानें त्यांना फळ्याजवळ नेलें; व इतर मुलांची चांगलीच खरडपट्टी काढली. श्री. जोशी यांच्या खेरीज इतर शिक्षकमंडळी त्यांना शिकण्यापासून परावृत्त करीत. शिकून तरी तुला महाराला कोण नोकरीला ठेवणार आहे? उगाच कशाला शिकतोस? केवढा दुष्टपणा हा! एकदां तर भीमराव रागानें बेफाम झाले व त्या शिक्षकांना पुष्कळच शिव्या दिल्या. दिल्या नसत्या तरच खरोखर आश्चर्य!

भीमराव क्रिकेट-फूटबॉल उत्तम खेळायचे; कधीं कधीं शाळेच्या संघाचे ते कर्णधारसुद्धां असत.

भीमराव चौथ्या इयत्तेंत गेले. संस्कृतच्या तासाला बसले. संस्कृत शिकविणाऱ्या शास्त्रीबोवानें या महाराच्या पोराला संस्कृत भाषा शिकवायचें नाकारलें. कारण वेदांची भाषा संस्कृत, ती बाटायची नाही कां महाराला शिकविल्यानें? अरेरे! या सनातन्यानीं हिंदुधर्माचा केवढा अधःपात केला! भीमरावानें पुष्कळ खटपट केली. हेडमास्तर पारशी गृहस्थ होते. पण त्यांचेंहि कांहीं चाललें नाहीं. भीमरावनें पर्शियन भाषा घेतली! नव्हें हिंदुधर्मानें मुसलमानी भाषा त्यांच्यावर जबरदस्तीनें लादली. वयाच्या पंचेचाळिसाव्या वर्षानंतर ते स्वतः परिश्रम करून संस्कृत शिकले. संस्कृतांतील सर्व ग्रंथांचें अध्ययन केलें, धर्मग्रंथांचा अभ्यास केला, धर्मशास्त्राचा अभ्यास केला; इतकेंच नाहीं, हिंदुधर्मामधील 'हिंदु कोड बिल' तयार केलें. पार्लमेंटमध्यें त्यासाठीं सर्व सनातन्यांच्या बरोबर भांडले. हिंदुधर्मातील स्त्रियांच्या बाबतींत होत असलेल्या धार्मिक आणि सामाजिक अन्यायाविरुद्ध झगडले. देशांतील विद्वान् संस्कृत शास्त्रीपंडितांच्या बरोबर धर्मग्रंथांच्या आधारानें वादविवाद केले. त्यांच्या संस्कृत ग्रंथांच्या ज्ञानाबद्दल न्यायमूर्ती गजेंद्रगडकर व महामहोपाध्याय काणे यांच्या तोंडून धन्योद्गार निघालेले होते.

बाबासाहेब आंबेडकर १९०७ सालीं मॅट्रिक झाले. हे अस्पृश्यामधील पहिलेच मॅट्रिक्युलेट म्हणून रा. ब. बोले यांच्या अध्यक्षतेखालीं त्यांचा सत्कार झाला. त्या वेळचे एक समाजसेवक दादा केळूसकर मास्तर यांनीं त्यावेळीं आंबेडकरांना एक पुस्तक बक्षिस दिलें. तें म्हणजे स्वतः केळूसकरांनीं लिहिलेलें 'Life of Gautam Buddha.' कसा योगायोग पहा!

## लग्न-समारंभ

बाबासाहेबांचें सोळाव्या वर्षीं लग्न झाल. त्यांच्या पत्नीचें वय त्यावेळीं नऊ वर्षांचें होतें. भायखळ्याचा जो उघडा भाजीबाजार आहे, त्याठिकाणीं रात्रीं सर्व भाजी दुकानदार निघून गेल्यानतर हा लग्नसमारंभ झाला. एका कोपऱ्यांत मुलाचें वऱ्हाड व दुसऱ्या कोपऱ्यांत मुलीकडची मंडळी उतरलेली होती. रात्रीं लग्न, जेवणखाण उरकून पहांटेस ४ वाजतां भाजी दुकानदार येण्याच्या पूर्वी सर्व लग्नाची मंडळी आपापल्या घरोघर निघून गेली. डॉक्टरसाहेब लहरींत असले म्हणजे आपल्या ह्या लग्नाची हकीकत मोठ्या मौजेनें सांगत असत. त्यांच्या पहिल्या पत्नीचें नांव रमाबाई. अति साधीभोळी बाई. भयंकर कष्ट करणारी. करीरोड










पुलाच्या बाजूला सकाळीं शेण्या घालायच्या व संध्याकाळीं गोळा करून घेऊन जायच्या. साहेबांना देवापलिकडे मानायची. साहेब सभांना जातात. हजारों लोकांना ज्ञान शिकवितात. म्हणजे करितात तरी काय हें! नेहमीं या बाईला मोठा अचंबा वाटायचा. एकदां साहेबांच्या बरोबर व्याख्यान पाहण्यास ही बाई आपली ट्रंक-सामान डोक्यावर घेऊन निघाली. डॉक्टरसाहेब रागावले हें सांगायला नकोच !

### कॉलेजांतील अध्ययन

बाबासाहेब एल्फिन्स्टन कॉलेजांत दाखल झाले. पहिलें वर्ष त्यांचें आजारांत गेलें. पैशाची अडचण पडली. श्री. केळुसकर मास्तर श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्याकडे बाबासाहेबांना घेऊन गेले. महाराजांनीं महिना ७५ रुपयाची शिष्यवृत्ति मंजूर केली. प्रो. म्युलर हे पुस्तकें देत, कपडे देत. कॉलेजचा भट मात्र चहा तर नाहींच पण पाणीसुद्धां देण्यास तयार नसायचा ! डॉक्टरसाहेब परळ-पोयबावडी येथील 'इंप्रुव्हमेंट ट्रस्ट'च्या सिमेंटच्या चाळींत खोली नं. ५० मध्यें राहात असत. १९१२ सालीं ते बी. ए. झाले. कर्नल प्राचार्य गजेंद्रगडकर त्याच वर्षी बी. ए. च्या परीक्षेंत पहिले आले. डॉक्टरसाहेबांनीं पुढें मुंबईमधील 'सिद्धार्थ' कॉलेजचे पहिलें 'प्रिन्सिपॉल' म्हणून प्राचार्य गजेंद्रगडकर यांची आपल्या संस्थेंत नेमणूक केली. ही एक महत्त्वाची घटना आहे.

देशांत त्यावेळीं सरकारचें दडपशाहीचें धोरण फार जोरांत चालू होतें. स्वातंत्र्यवीर सावरकरांना अंदमानांत टाकलेले होते. लोकमान्य टिळकांना मंडालेमध्यें डांबून ठेवण्यांत आलें होतें. देशभर धरपकड चाललेली होती. बाबा सारखे संतापत असत. त्यांनीं 'Evolution of Provincial finance in British India' या आपल्या प्रबंधामध्यें स्पष्ट लिहिलें आहे. 'The Indian Statute Book is besmeared with a set of repressive laws hardly paralleled in any other parts of the world. "Conservative, repressive, irresponsible and poured money on services and not on Education and Industry." अशा शब्दांत तत्कालीन नोकरशाहीची निर्भर्त्सना केली आहे. मोर्ले-मिंटो सुधारणा कायद्यावर त्यांनीं अतिशय कडक टीका केली होती.

### परदेशांतील अध्ययन

बाबासाहेबांना बडोद्यामध्यें नोकरी मिळाली. लेफ्टनंट म्हणून संस्थानी लष्करांत त्यांनीं कांहीं दिवस नोकरी केली. गायकवाड महाराजांनीं त्यांना अमेरिकेला पाठविलें. अब्राहाम लिंकन व निग्रोद्धारक बूकर टी. वॉशिंग्टन यांच्या पुण्यभूमीला आपल्याला जायला मिळते आहे, या विचारांनीं बाबासाहेबांचें हृदय भरून आलें ! अमेरिकेमधून आपल्या एका मित्राला लिहिलेल्या पहिल्याच पत्रांत त्यांनीं लिहिलें कीं, शेक्स्पियर म्हणतो, 'There is a tide in the affairs of men – which, taken at the flood, leads on to fortune' आपण शिकलों. समाजाचें काय ? समाजाचें ऋण आपण फेडायला पाहिजे. हेच विचार बाबासाहेबांच्या डोक्यांत त्यावेळीं सारखे घोळत असत.

मुंबई विश्वविद्यालयाचे ते बी. ए. झाले ते इंग्रजी आणि पर्शियन हे विषय घेऊन झाले. अमेरिकेमध्यें ते एम्. ए. झाले ते राज्यशास्त्र, नीतिशास्त्र, मानवजातिशास्त्र, समाजशास्त्र व अर्थशास्त्र विषय घेऊन. प्रा. एड्विन., आर. ए. सेलिग्मन् या विद्वान प्राध्यापकांच्या हाताखालीं ते शिकले. 'Ancient Indian, Commerce' व 'Castes in India their mechanism, genesis and development' हे त्यांचे प्रबन्ध मोठमोठ्या विद्वानांच्या कडून फार प्रशंसित झाले. अमेरिकेच्या राज्यघटनेचा त्यांनीं अभ्यास केला. त्या घटनेमधील कलम १४, कीं ज्या कलमानें नीग्रो लोकांचें स्वातंत्र्य जाहीर करण्यांत आलें, त्या कलमानें त्यांच्या मनावर फार परिणाम केला. ज्या वेळेस भारताला स्वातंत्र्य मिळेल, त्याची राज्यघटना तयार केली जाईल, जर आपल्याला ती राज्यघटना तयार करण्याची संधी मिळाली, तर त्या भारताच्या राज्यघटनेमध्यें अस्पृश्यतेच उच्चाटन करण्यासाठीं असेंच एक कलम घालण्याचा आपण प्रयत्न करूं. आणि काय योगायोग पहा ! भारताला स्वातंत्र्य मिळालें. राज्यघटना तयार झाली. बाबासाहेब घटना समितीच्या मसुदा-समितीचे सदस्य झाले. त्यांनीं घटना तयार केली. अस्पृश्यता हा



अनुक्रमणिका





एक गुन्हा आहे, असें कलम त्यांनीं त्या घटनेमध्यें घातलें. ती घटना पार्लमेंटपुढें त्यांनीं स्वतः मांडून मंजूर करून घेतली. किती धन्यता वाटली असेल त्यांना ! १९१५ सालीं नीग्रो लोकांचा उद्धारकर्ता बूकर टी. वॉशिंगटन वारला. तो एक महान् समाजसुधारक होता. त्याच्या मृत्यूमुळें बाबासाहेबांना अत्यंत दुःख झालें. बाबासाहेबांचा बुकर टी. वॉशिंगटनबरोबर चांगला परिचय होता. प्राध्यापक डॉ. सेलिग्मन यांचा आणि देशभक्त लाला लजपतराय यांचा मोठा स्नेहभाव होता. लाला लजपतराय यांनीं बाबासाहेबांना त्यांच्या "रिव्होल्युशनरी'पक्षामध्यें आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. बाबासाहेबांनी एका पत्रांत लजपतराय यांना कळविलें कीं मी बडोदा सरकारच्या पैशावर अमेरिकेंत आलों आहे. तें सरकार मला शिष्यवृत्ति देत आहे. परत गेल्यावर मी त्या सरकारमध्यें नोकरी करण्याचें वचन दिलें आहे. यासाठीं "I must complete my studies without betraying the trust of the Maharaja who has given me an opportunity in life." अहाहा ! केवढा प्रामाणिकपणा हा ! वचनाला आणि इमानाला जागणारे आजच्या जगांत आपल्याला असे किती लोक सांपडतील. कर्तव्यनिष्ठेची पराकाष्ठाच आहे ही. नाहींतर राजकारणाचा मोह तो ! आणि विद्यार्थी-दशेंत राजकारण म्हणजे दुर्दम्य प्रलोभन ! केवढा संयम बाबासाहेबांना करावा लागला असेल ! अभ्यास पुरा करणें, विद्यार्जन मोठ्या निष्ठेनें पार पाडणें, यावर बाबासाहेबांचा मोठा कटाक्ष असे. विद्या संपादन केल्याशिवाय, आपलीं विद्यार्थीदशेंतील कर्तव्यें पुरी केल्याशिवाय, राजकारणाच्या मोहामध्यें तरुणांनीं पडतां कामा नये, हें ते नेहमीं सांगत असत. विचारानें आणि बुद्धीनें अपक्व माणसें समाजाचें हित करूं शकत नाहींत. नव्हे, कांहीं वेळेला त्यांच्या हातून हिताच्या ऐवजीं अनहित मात्र होतें.

### मुंबईतील सत्कार-समारंभ

बाबासाहेब मुंबईला परत आले. मुंबईच्या नागरिकांनीं कै. चुनिलाल सेटलवाड यांच्या अध्यक्षतेखालीं त्यांची सत्कार-सभा घेतली. "मी काय केलें आहे मोठें ? अभ्यास केला, परीक्षा दिल्या. समाजाचें माझ्या हातून काम होईल, तेव्हांच मी सत्कारास पात्र होईन." बाबासाहेब सत्कार-समारंभास हजर राहिले नाहींत. घरींच बसून राहिले. सभा आटपल्यानंतर अध्यक्ष व इतर मंडळी त्यांना हुडकीत घरीं गेली आणि त्यांना हारतुरे दिले ! केवढी प्रसिद्धी-पराङ्मुखता ! नाहींतर, आज सत्कार-सभा कशा घडवून आणल्या जातात, याचे किळसवाणे प्रकार आपल्या नेहमीच्या पाहण्यांतले आहेत.

### बडोद्यांतील अनुभव

बाबासाहेब बडोद्याला गेले. महाराजांनीं त्यांना बडोदा स्टेशनवर घेण्यासाठीं अधिकारी मंडळीनें जावें, असा हुकूम काढला होता. एकहि मनुष्य गेला नाहीं ! त्यांची नेमणूक Military Secretary to Maharaja आणि नंतर Finance Minister अशी झालेली होती. महाराजांचा येवढा मोठा अधिकारी ! पण राहायला जागा कोणी देईना. हॉटेलांत सुद्धां जागा मिळेना. एका इराण्याच्या हॉटेलामध्यें नांव बदलून त्यांना रहावें लागलें, ही अस्पृश्यता. हा मोठा सरकारी अधिकारी, पण ऑफिसांतील शिपाई साहेबांच्या टेबलावर फायली दुरून फेकायचे ! या अस्पृश्याचा अंथरलेल्या सतरंजीवर पाय पडेल, व ती सतरंजी बाटेल म्हणून ते आल्याबरोबर सतरंजी गुंडाळून ठेवायची ! शिपाई पाणी सुद्धां आणून द्यायचे नाहींत. खोटें नांव उघडकीस आलें, आणि त्या इराण्याच्या पारशी मित्रांनीं बाबासाहेबांना काठीनें बडवून काढलें. बाबा गांवाबाहेर गेले ! आणि निवांत अशा झाडाखालीं लहान मुलासारखे रडले ! ही हृदयद्रावक गोष्ट आम्हांला सांगतांना बाबासाहेबांचे हुंदके बाहेर पडत !

### इंग्लंडला प्रयाण

बडोदें सोडलें, आणि बाबासाहेब पुन्हां इंग्लंडला गेले. त्यांना राहिलेला अभ्यास पुरा करावयाचा होता. बडोद्याचे महाराज आपल्या स्वतःच्या स्पृश्य अधिकाऱ्या विरुद्ध कांहीं करूं शकले नाहींत तरी श्री. दादा केळुसकरांच्या सांगण्यावरून बाबांना महाराजांनीं पैशाची मदत केली. बाबा D.sc., Ph.D. या पदव्या घेऊन परत आले. मुंबई सरकारनें त्यांना सिडनहॅम कॉलेजमध्यें प्राध्यापक नेमले. कॉलेजमधील स्पृश्य प्राध्यापकांनीं या नवीन प्राध्यापकावर बहिष्कार पुकारला. कोणी बोलायचें नाहीं. त्यांच्या शेजारीं बसून चहा प्यायचा नाहीं. पाणी प्यायला मिळायचें नाहीं !

विद्वान् अस्पृश्याची ही अवस्था ! मग कोट्य-








बघि मुक्या अस्पृश्य बांधवांची काय स्थिति असेल ? बाबासाहेबांचे हाल थांबले नाहींत ! डॉ. परांजपे शिक्षण-मंत्री असतांना बाबासाहेबांना स्पृश्यांच्या दडपणाखालीं सिडनहॅम कॉलेजचे प्रिन्सिपल ते नेमूं शकले नाहींत !

### वकिलीस सुरुवात

मुंबईमध्यें डॉ. आंबेडकर बॅरिस्टर म्हणून वकीली करूं लागले. परळच्या सिमेंटच्या चाळींत ५० नंबरची खोली. एक तरटाचा तुकडा व एक बैठें स्टूल - येवढेंच बॅरिस्टरसाहेबांच्या ऑफिसामधील फर्निचर ! कामें महारांचीं मिळायचीं ! ती सुद्धां फीशिवाय ! बॅरिस्टरांना सॉलिसिटर मार्फत कामें मिळायचीं. सॉलिसिटर सगळे स्पृश्य. या अस्पृश्य बॅरिस्टरला कोण काम देतो ? न देण्यासाठीं कॅन्व्हसिंग ! खेड्यांपाड्यांत कामासाठीं गेले. तर टांगा मिळायचा नाहीं. वाटेंत पाणी नाहीं का चहाचा प्याला नाहीं ! आम्हीं बाबासाहेबांच्या बरोबर उन्हातान्हांत मैलच्यामैल गेल्याचें विसरूं शकत नाहीं !

### मध्यवर्ती सरकारांत नेमणूक

मध्यवर्ती सरकारांत त्यांची मजूरमंत्री म्हणून नेमणूक झाली. मध्यवर्ती सरकारचे अधिकारी तो हुकूम दाखविण्यासाठीं नागपूरला डॉक्टरसाहेब होते तिकडे गेले. आदल्याच दिवशीं मोठ्या प्रचंड मिरवणुकीनें बाबासाहेब नागपूरच्या शहरांतून हिंडले होते. परंतु बाबासाहेब कोठें उतरले आहेत हें कोणी या अधिकाऱ्यांना सांगेना. कलेक्टर, पोलीस अधिकारी कोणालाहि जणूं काय माहिती नव्हती ! एका महार टांगेवाल्यानें माहिती दिली, व त्या अधिकाऱ्यांना महारवाड्यांत बाबासाहेबांच्याकडे घेऊन गेले. स्वाभिमानी अंतःकरणाला काय वाटलें असेल ?

सिंहगडावर विश्रांतीसाठीं गेले. त्यांच्यावर हल्ला ! ठाकुरद्वारच्या देवळाच्या आवारांत मित्राकडे गेले ! हल्ला ! देवरूखकरांच्या खुनाची चाकशी करण्याकरितां परळला मजकडे आले ! मोटारवर ॲसिडचे बल्ब ! गांधीवधाच्या वेळीं मुंबईमधील घरावर हल्ला, त्यांच्या छापखान्याची राखरांगोळी. त्यांनीं भारताची राज्यघटना तयार केली ! कोणी केलाय गौरव त्यांचा ? हिंदुधर्म अधिक प्रभावी व्हावा, म्हणून हिंदुकोड बिल तयार केलें. केलाय गौरव कोणी ? मजूरमंत्री असतांना, कामगारांच्या कामाचे तास कमी केले; ओव्हर टाईमचा दीडपट पगार पाहिजे. खाणी कामगारांना प्रॉव्हिडंट फंड, वगैरे आमूलाग्र सुधारणा केल्या. दिलंय त्यांना श्रेय कोणी ? अशा शेकडों गोष्टी सांगतां येतील !

अशा स्वाभिमानी व्यक्तीला हिंदुधर्माबद्दल काय वाटावें ? स्पृश्य समाजाबद्दल काय वाटावें ? ज्या देशांत अशा गोष्टी राजरोस चालतात, त्या देशाबद्दल काय वाटावें ? शब्दांत कडवटपणा आला ! लिखाणांत कडवटपणा आला ! वागणुकींत कडवटपणा आला ! काय आश्चर्य त्यांत ?

धार्मिक आणि सामाजिक विषमतेचें हिडिस स्वरूप हें ! हिंदुसमाजांतील अस्पृश्यतेचा हा मोठा बळी ! सार्वजनिक सभेंत मी बोललों कीं डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचें 'Crucification' झालें ? काय खोटें आहे त्यांत ?

---

## ईश्वराच्या भरंवशावर

मी क्रांतीचें चिन्तन करीत आहे. मला असें वाटतें कीं, जगांतील घडामोडी आम्हाला एका महान् संकटाकडे फरपटत ओढून नेत आहेत. जगांतील नेते चिंताग्रस्त झाले आहेत. त्यांना माहिती आहे कीं, त्यांच्याजवळ जीं शस्त्रें आहेत त्यांचा उपयोग करतां कामा नये. परंतु तरीसुद्धां ते त्या शस्त्राविषयींचा मोह व विश्वास सोडूं शकत नाहींत. ज्यांना हिंसेच्या निष्क्रियतेबद्दल खात्री आहे आणि आपल्या उद्दिष्टांचें स्पष्ट ज्ञान आहे असे लोक नेतृत्व स्वीकारतील. त्यांचें म्हणणें लोक अधिक लक्ष देऊन ऐकतील. अहिंसा हा सर्वांत उत्तम कार्यशील व व्यावहारिक विचार आहे. हाच विचार लोकांना निरनिराळ्या प्रकारांनीं प्रभावित करीत आहे. जग तीव्र वेगानें अहिंसेकडे धांव घेत आहे. १९५७ साल अतिशय महत्त्वाचें ठरेल. यांत मला बिलकुल संदेह वाटत नाहीं. ही भविष्यवाणी नाहीं किंवा अंधविश्वासहि नाहीं; हें कठोर सत्य आहे. भूदान आंदोलन मुख्य तीन परिस्थितींतून निभावून गेलें आहे. भूदानाच्या विचाराचा जन्म झाल्यानंतर आम्हाला बिहारमध्यें सार्वजनिक स्वरूपांत दानें मिळालीं. ओरिसामध्यें आम्हाला १००० हून अधिक गांव मिळाले. आम्हाला आशा आहे कीं, तामिळनाडमध्यें आम्हाला खऱ्या ग्रामोद्याचें म्हणजे ग्राम्य राज्याचें दर्शन घडेल. हें आंदोलन परमेश्वराच्या हातीं आहे. माझ्या हातांत आंदोलनाची कोणतीच रूपरेषासुद्धां नाहीं. कोणी एक अदृश्य शक्ति आम्हाला मार्गदर्शन करीत आहे.

— विनोबा










श्री. ह. कृ. मोहनी

# "डॉ. आंबेडकरांचें धर्म - परिवर्तन"

१४ ऑक्टोबर १९५६ ह्या दिवशीं श्री. डॉ. आंबेडकर ह्यांनीं हजारों लोकांबरोबर बुद्ध धर्माची दीक्षा धार्मिक विधिपूर्वक नागपूरला ग्रहण केली; आणि ६ डिसेंबर १९५६ रोजी त्यांचें दिल्लीस प्राणोत्क्रमण झालें. दोन महिन्यांपेक्षाहि हा काल अल्प ठरावा, हा दारुण दैवदुर्विलास आहे. सहस्रावधि अनुयायांसह हिन्दुधर्म सोडून बुद्ध धर्माचा अंगीकार करणें आपणास अपरिहार्य आहे, असें कित्येक वर्षें मनन व चिन्तन करून डॉ. आंबेडकरांनीं ठरविलें होतें; आणि ही घटना हिन्दुधर्माच्या इतिहासांत क्रांतिकारक ठरेल अशी त्यांनी बळकट अपेक्षा बाळगली होती. डॉ. आंबेडकर ह्यांचेंच व्यक्तिगत माहात्म्य अशा निष्ठापूर्वक केलेल्या धर्मपरिवर्तनास मुख्यत: जबाबदार बनलेलें असल्यामुळें ह्या व्यक्तिनिष्ठ अत्यंत महत्त्वाच्या घटनेमुळें त्यांच्या सहस्रावधि अनुयायांवर कोणती भविष्यकालीन वैचारिक प्रतिक्रिया होते, हिन्दुधर्मानुयायांवर ह्या परिणामकारक आघातामुळें कोणता इष्ट असा बदल घडून येतो, परदेशस्थ बुद्धधर्मीयांमध्यें ती किती प्रमाणांत इष्ट, हितकारक व अभिनंदनीय बनते, हें अजमावणें त्यांच्या ह्या अनपेक्षित, अकाली व शोककारक मृत्यूमुळें आज तरी फार कठीण होऊन बसलेलें आहे.

## निष्प्राण धर्माचा त्याग

बुद्धधर्म स्वीकाराच्या या घटनेनें डॉ. आंबेडकर ह्यांच्या व्यक्तित्वावर कळस चढविला होता. त्यांचें सर्व आयुष्य ज्ञानोपार्जन, समाजकल्याण व धर्मजिज्ञासा ह्या थोर मूल्यांप्रीत्यर्थ केलेल्या तपश्चर्येनें पूर्ण भरलेलें होतें; आणि म्हणूनच असें नि:संदेहपणें म्हणतां येत होतें कीं, त्यांना आणखी कांहीं काळ जर आयुष्य लाधलें असतें, तर त्यांच्या लाखों धर्मानुयायांस तें उन्नतिकारक व मार्गदर्शक झालें असतें; एवढेंच नाहीं तर अनेक हिन्दुधर्मीयांसहि तें उपकारक बनलें असतें. त्यांचा प्रदीर्घ, गाढ व सखोल विद्याव्यासंग, त्यांनीं पाश्चात्त्य समाजाचें व संस्कृतीचें अत्यंत जवळून केलेलें निरीक्षण, प्रखर स्वाभिमानामुळें त्यांनी जन्मभर संग्रहीत केलेले कटु अनुभव, गेल्या तीस वर्षांतील राजकारणामुळे त्यांच्या मनावर झालेली अनेकविध प्रतिक्रिया, त्यांचें स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर काळांतील कायदे-कौन्सिलांतील प्रभावी सभासदत्व, सरकारदत्त अधिकारपदप्राप्ति, समाजान्तर्गत पुढारीपणा, मातबर प्रतिपक्षीयांशीं झालेले चिरपरिणामी संघर्ष, ह्यामुळें त्यांचें व्यक्तिमत्त्व अनन्यसाधारण बनलेलें होतें. अशी तेजस्वी विभूति सांप्रत अस्तंगत झाल्यामुळें, नुकत्याच घडून आलेल्या धर्मपरिवर्तनामागची ज्योत, स्फूर्ति व चेतना नाहींशी झाली आहे; म्हणून तें धर्मपरिवर्तन कितपत लोकहितकारक बनतें ह्या बद्दल भविष्यकालीन अंदाज बांधणें दुरापास्त झालें आहे.

डॉ. आंबेडकर ह्यांना व्यक्तिदृष्ट्या व समाजदृष्ट्या धर्म ही भावना आधुनिक काळांतहि उपेक्षणीय आहे, असें मुळींच वाटत नव्हतें. मनुष्याचें अस्तित्व केवळ आधिभौतिक भावनांपुरतें मर्यादित राहूं नये, असा कटाक्ष त्यांनीं जन्मभर बाळगल्यामुळें रूढ, निष्प्राण व अपरिवर्तनीय अशा हिन्दुधर्माचा त्याग करून बुद्धधर्माचा स्वीकार स्वत: कडून व इतरांकडून करविणें त्यांना आवश्यक वाटलें. बहिष्कृत व अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या जातींत










जन्मल्यामुळें व लहानपणापासून स्वाभिमान हा गुण शिक्षण व परिस्थितीमुळ तीव्र स्वरूपांत उद्दीपित झाल्यामुळें, आयुष्यभर त्यांना मानसिकदृष्ट्या अपमान व कष्ट सहन करून सारखा संग्राम करण्यावाचून गत्यंतर राहिलें नाहीं. कोणत्याहि अस्पृश्य जातींत जन्म झालेल्या स्वाभिमानी व प्रामाणिक मनुष्यास, मानसिक सुख व समाधान मिळून हिंदू समाजांत स्वोन्नतीचा मार्ग चोखाळतां येईल अशी परिस्थिति नाहीं. अस्पृश्य जातींत जन्मल्यामुळें नशिबीं आलेलें हें सामाजिक असमानतामूलक वातावरण गेल्या शंभर वर्षांत हळूं हळूं बदलत आहे, समाजसुधारक व राज्यसंस्था इष्ट दिशेनें वाटचाल करीत आहेत, असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. परंतु अस्पृश्य समाजाच्या दृष्टीनें विचार केल्यास हें प्रगतीचें पाऊल, राजकीय स्वातंत्र्य मिळाल्यानंतरहि अत्यंत मंद आहे असें त्या समाजांतील व्यक्तीस वाटत असल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं. डॉ. आंबेडकर हे अद्वितीय अवतारी गृहस्थ समजले जाण्याइतकी त्यांची योग्यता आहे, अशी बहुसंख्य अस्पृश्यांची ज्या प्रमाणांत धारणा बनूं शकते, त्या प्रमाणांत डॉ. आंबेडकरांबद्दल अत्यंत सहानुभूतीनें कृतज्ञताबुद्धि व आदर बाळगून अस्पृश्यतेनें निर्माण केलेल्या समस्येबद्दल विचार करणारांची संख्या सुशिक्षित अशा स्पृश्य हिन्दूंतहि कमी आहे. आणि म्हणूनच अस्पृश्य समाजास इष्ट त्या सामाजिक प्रगतीबद्दल फार निराशा आहे. समाजसुधारणेच्या दृष्टिकोनानें समाजाचें निरीक्षण करणारांची व आचरण बदलविण्याची खटपट करणारांची संख्या हिन्दु समाजांत फार अल्प आहे, हें कबूल करणें इष्ट व प्राप्त आहे.

सुशिक्षित जनमनाच्या उत्साहशक्तीचा ओघ, राजकीय स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सामाजिक विषमता नष्ट करण्याकडे जोरानें वळेल अशी अपेक्षा अस्पृश्य जातींतील स्वाभिमानी व्यक्तींनी बाळगली असल्यास, त्यांना समाधान वाटेल अशी परिस्थिति निर्माण झालेली नाहीं. सामाजिक विषमता अत्यंत कष्टदायक स्वरूपांत त्यांनाच प्रतीत होते. भंगी, महार, चांभार इत्यादि अस्पृश्य जाती, आदिवासी व स्त्रिया ह्यांना नित्य प्रतीत होणारा सामाजिक अन्याय खेडोपाडीं देखील नष्ट होण्याच्या मार्गांत आहे, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर उत्साहवर्धक नवीनच वातावरण आपल्या भोवतीं निर्माण झालेलें आहे असें दर्शन त्यांना होऊं शकत नाहीं. हळूहळू सर्वकांहीं सुधारणा होतील, सामाजिक प्रगतीकडे समाज मार्ग आक्रमण करीत आहे; ह्या अन्यायी अवनत परिस्थितीचें कारण हें आहे की, आपली संस्कृति फार जुनी आहे व अज्ञानानें आपल्या पूर्वजांनी बद्धमूल धर्माचारांची पानें चाळण्याची उपेक्षा केल्यामुळें तीं सडलीं आहेत; अनेक शतकांचा संस्कार बदलविण्याच्या समस्येबाबत इतका उतावळेपणा गैरवाजवी आहे; असें समर्थन करून धीमेपणाचे गोडवे गाइल्याने, ज्यांना अन्यायाचे चटके प्रत्येक पाउलास बसत आहेत, त्यांना धीर देण्याचें कार्य घडून येऊं शकत नाहीं. सभोंवार सहानुभूतीचें वातावरण जर सर्वत्र दृग्गोचर होत असतें, संकोच आणि नम्रता बहुसंख्य सुशिक्षितास वाटली असती, झपाट्यानें सामाजिक आचार बदलत आहेत असा निर्वाळा मिळाला असता, तर श्री. आंबेडकरासारख्या पुढाऱ्यास इतकें असमाधान वाटण्याचें कारण पडलें नसतें. पण प्रामाणिक सुधारकाबद्दल जेव्हां समाजांत सरसहा हेटाळणी होते, त्याचा तीव्र स्वाभिमानदर्शक त्वेष समाजांत सन्मान पावलेले सुशिक्षित सामावून घेण्यास तत्पर दिसत नाहींत; उलट सुधारकांनी जितकी गरिबी व चांगुलपणा दाखवावा, तितकी प्रतिपक्षीयांची आढ्यता, उद्दामपणा व अहंकार वाढीसच लागतो आहे, असें कर्त्या सुधारकांस दिसूं लागतें, त्यावेळीं समाजाबद्दलची त्यांची सहानुभूति, जिव्हाळा व आत्मीयभाव कमी झाल्यास त्यांत कांहींच








आश्चर्य नाहीं. श्री. आंबेडकरांना हिन्दुधर्माचा वीट येऊन त्यांनी बुद्धधर्माचा स्वीकार करण्यास वीस वर्षें घेतलीं. ह्या गंभीर समस्येबाबत निर्णय घेण्यास त्यांनी पुष्कळच धिम्मेपणा दाखविला. अनेक पर्यायांचा विचार करण्यांत वाट पाहिली. हें श्रेय त्यांना दिल्यावाचून हिन्दूधर्मीयास गत्यंतर नाहीं. बहुसंख्य सुशिक्षित हिन्दुधर्मीयांमध्यें परंपरागत रूढी व आचारासंबंधी सुधारकांची वृत्ति समजून घेऊन तिच्याशी समरस होण्याचा उदारपणा नाहीं. तीव्र संवेद्यतेचा अभाव आहे. त्यांच्या हृदयांत सहानुभूतीचा ओलावा व दिलदारवृत्ति यांची वाढ होती नाहीं. खऱ्या धार्मिकपणाचा संकोच गेल्या शतकांत सुसिक्षित मध्यम वर्गांमध्यें पुष्कळच झालेला आहे. एरवी परंपरागत धर्माचा त्याग करून डॉ. आंबेडकरांसारखा सुप्रसिद्ध, अनुभवी व परिपक्व विचाराचा नेता, इतक्या मोठ्या समुदायास बरोबर घेऊन बुद्ध धर्माचा स्वीकार करतो; ह्या घटनेच्या अर्थाचें आकलन होऊं शकत नाहीं.

## सामाजिक अन्यायाची पराकाष्ठा

डॉ. आंबेडकरांस जी रूढी, परंपरा व संस्कार जन्मभर जडले ते जातिसंस्थेपासून निर्माण झालेले आहेत. आणि जातिसंस्था हेंच सद्यःकालीन अवनत हिंदु धर्माचें बहुतांशीं कवच, शरीर व प्राण आहे. जगदुत्पत्तीसंबन्धी कांहीं कल्पना किंवा बौद्धिक उपपत्ति, ईश्वर किंवा देवताविषयक भावना, मृत्यूनंतर जीवात्म्याच्या भवितव्याबद्दल स्वर्ग-नरकासारखे विचार, अनेक प्रकारच्या मनोवांछित पारलौकिक अवस्थांबद्दलची मतें, अलौकिक किंवा अवतारी पुरुषाबद्दलच्या धारणा, गूढज्ञानाबद्दलचे अनुभव, मनुष्याच्या अंतिम मूल्याबद्दलच्या विशिष्ट मनोवृत्ति, किंवा मोक्ष, ब्रह्मनिर्वाण अपरानुभूति इत्यादि संज्ञांनी दर्शित होणारीं ध्येयें, पवित्रता प्राप्त झालेलीं वचनें, संदेह, ग्रंथ, व स्थळें, व्यक्ति आणि समाज यांच्या स्थैर्यास व उन्नतीस पोषक होणारे नीतिविचार व आचार, ह्या सर्व प्रकारांमधून निर्माण झालेले संस्कार व व्यवहार, ह्यांचा एकजीव होऊन धर्म ही पदवी प्राप्त झालेली असते. सध्याची आपल्या धर्माची अवस्था लक्षांत घेतल्यास ईश्वरविषयक व पारलौकिक विचाराबाबत आस्था व श्रद्धा शिक्षित लोकांमध्यें पुष्कळ प्रमाणांत कमी झालेली आहे. कारण जग कसें निर्माण झालें, प्रस्तुतच्या आपल्या आयुष्याचें व त्यांतील नानाविध मनोरचनेचें आणि अनुभवांचें प्रधान कारण कोणतें आहे, मृत्यूनंतर आपली निश्चित अशी अवस्था काय आहे, ह्याबद्दल शास्त्रीय विचारांचा निकष लावून ठामपणें कांहीं म्हणतां येईल, अशी खात्री क्वचितच एकाद्यास असूं शकेल; आणि एकाद्याची तशी खात्री असली तरी त्याचें म्हणणें इतर विचारी लोकांस मान्य होईल असें नाहीं. परंतु अशा डळमळीत, केवळ श्रद्धापूर्ण धर्मविचारामुळें दारुण सामाजिक अनवस्था जेव्हां प्रत्ययास येते, व व्यक्तीच्या विकासास जेव्हां ती बाधा करिते तेव्हां या धर्मभावना कुचकामी व त्याज्य वाटूं लागतात. कारण प्राचीन परंपरेमुळें सामाजिक अन्यायास त्या पोषक बनलेल्या असतात.

अस्पृश्य समजलेल्या जातीचा विटाळ मानणें हा आपला धर्म आहे असें स्पृश्य हिन्दू जेव्हां मानतात, तेव्हां सामाजिक अन्यायाची पराकाष्ठा झालेली असते. त्यांची सावली पडल्यानें शुचित्व नष्ट होतें ह्या विचारापासून स्पृश्य हिन्दूच्या दोन चार पिढ्या कदाचित् परावृत्त झालेल्या असतील. परंतु सामान्य आर्थिक जीवन जगण्याच्या व जगूं देण्याच्या आड जर प्राचीन धार्मिक परंपरा येत असतील, खाण्यापिण्याच्या अगदीं सामान्य गरजा भागविण्याच्या मार्गांत रूढ धर्मभावनांचा व्यत्यय येत असेल, विवाहसंस्थेपासून शारीरिक व मानसिक सुखाची आशा बाळगण्यामध्यें अडथळा उत्पन्न होण्यास त्या मदत करीत असतील, तर स्वाभिमानी मनुष्यानें








आपल्या धर्माबद्दल सबूर तरी किती करावी हा मोठाच प्रश्न आहे. हिन्दु समाजानें धर्मविषयक असमर्थनीय, विचित्र व अन्यायी रूढी शतकानुशतकें चालू ठेविल्या. ह्याचें कारण सामाजिक अपमानाची चीड त्या समाजांत खोलवर गेलेली नाहीं हें आहे. समाजानें संस्कृतीच्या अर्थाची उलटापालट केली आहे. सहिष्णुता हा गुण असला तरी कोणत्याहि अन्यायास मान तुकविणें हा दोषच समजला पाहिजे. भीरुता म्हणजे चांगुलपणा नाहीं. परंतु आपल्या समाजांत स्वाभिमानशून्यतेला सात्त्विकतेचा मुलामा सारखा चढविला जात आहे. प्रामाणिक बंडखोरपणा अनेक सुसंस्कृत मानल्या गेलेल्या व्यक्तींमध्यें क्वचितच निर्माण झालेला दिसतो. अशा सद्गुणी बंडखोरपणास चिरडून टाकण्याचेंच पौरुष समाजाच्या उच्च थरांत एकवटलेलें आहे. विरोधामध्यें चांगुलपणा शोधण्याची वृत्ति सुसंस्कृत लोकांमध्येंहि सांपडणें मुष्कील झालें आहे; आणि म्हणूनच दुष्ट, रानटी, मानव्यास कमीपणा आणणाऱ्या व हानिकारक अशा परंपरा धार्मिकतेच्या नांवाखालीं शतकानुशतकें चालू राहतात.

## धोक्याचा लालबावटा

हिन्दुस्थानांतील आर्य किंवा ब्राह्मण धर्मांत आणि हिन्दु संस्कृतींत, ईश्वर व अवतार, कर्मविपाक सिद्धांत, पापपुण्याची उत्पत्ति, पुनर्जन्मवाद, मोक्षधर्म ह्या मूल्यांबद्दल सूक्ष्म विचार केलेला आहे. व ह्या विशिष्ट तत्त्वज्ञानावर अधिष्ठीत झालेल्या श्रद्धा शतकानुशतकें स्थिर केल्या गेल्या आहेत. वाक्यावर स्थिर केलेल्या ह्या गृहीत तत्त्वज्ञानी विचारसरणीमुळें जातिभेदास सामाजिक स्थैर्य आणलें गेलें आहे. वास्तविक पाहतां कोणतेंहि बौद्धिक तत्त्वज्ञान स्थिर, शाश्वत, व अपरिवर्तनीय आहे असें मानतां येणार नाहीं. " बुद्धीची ही अंतिम कक्षा आहे " असें मानलें जाणाऱ्या कोणत्याहि तत्त्वज्ञानाचा अर्थ, त्या विचारसरणीचें रहस्य समाजाच्या परिस्थितीवर अवलंबून असतें. सत्य हेंच मुळीं मानवी विचार व भौतिक परिस्थिति ह्या दोन घटनांच्या सांनिध्यांतून व प्रतिक्रियेतून—द्वंद्वांतून—निर्माण झालेलें असतें. म्हणून सत्याचा अर्थ करावयाचा किंवा सत्य समजल्या जाणाऱ्या परंपरागत सिद्धांतांचा आशय समजून घ्यावयाचा तर प्रत्यही बदलणाऱ्या परिस्थितीचें सम्यक् ज्ञान असणें आवश्यक आहे. भौतिकशास्त्रांतील सत्य, आणि मानसिक, अध्यात्मिक व सामाजिक विचारसरणीतून निष्पन्न झालेलें सत्य हें एकसारखें नाहीं. परंतु अलौकिक विभूति, परंपरागत शब्द, संदेश, ग्रंथ व रूढी ह्यांनाच अंतिम मूल्य जेव्हां प्राप्त होतें, आंधळी श्रद्धा हीच जेव्हां जीवनाचें सुकाणू बनते, तेव्हां समाजांत स्फूर्ति, प्रतिभा, नवविचारजागृति निर्माण होण्याची क्रिया मन्द पडते. पाश्चात्त्य संस्कृतीमधील विचारांचा सम्पर्क व संघर्ष जेव्हां आमच्या समाजांत सुरू झाला तेव्हां नवीन सद्भावनांचे वारे सुटूं लागले व त्यामुळें कांहीं विचारवंत हादरून गेले. ही क्रिया समाजांत दोन तीन शतकें सुरू आहे. परंतु सामाजिक परंपरागत बंधनांच्या पोलादी चौकटीची घडण शतकानुशतकांची असल्यामुळें विचार एकीकडे व जीवन भलतीकडे अशी अनुकंपनीय अवस्था बहुतेक सर्व विचारवंतांची झाली आहे. त्यांपैकीच पिंजऱ्यांतून बाहेर पडून जीवन जगणारे स्वातंत्र्यप्रेमी महाभाग अत्यंत विरळा ठरावेत ह्यांत कांहीं नवल नाहीं. डॉ. आंबेडकर पाश्चात्त्य विद्याविभूषित व अनेक शास्त्र पारंगत असे पंडित असल्यामुळें त्यांनी स्वाभिमान द्योतक अशा विचारी मनाची तडफड जन्मभर कायम ठेवली व आपल्या तीव्र इच्छाशक्तीच्या जोरावर ह्या कांटेरी कुंपणामधून ते बाहेर पडले. वास्तविक पाहतां कर्मविपाक सिद्धांत, पुनर्जन्मवाद, ईश्वराबद्दल अनेक अर्थ झाल्यामुळें त्याची निष्ठा, पारलौकिक अवस्थांबद्दल उपपत्ति ह्या वरील सुशिक्षित समजल्या जाणाऱ्या समा-

जाच्या भावना दृढ राहिल्या नाहींत. प्राचीन श्रद्धा डळमळीत झालेल्या आहेत. परंतु या धार्मिक श्रद्धा स्पृश्य हिंदूंतहि कमी झाल्या असल्या तरी डॉ. आंबेडकरासारख्यास जितक्या विषम, दुष्ट व अन्यायी परिस्थितीस तोंड द्यावें लागतें, तितकी भीषणता स्पृश्य हिन्दूस प्रतीत होत नाहीं. म्हणून तो धर्मविचाराने जरी अस्पृश्यतेस स्थिर करणाऱ्या जातिभेदाचें समर्थन करीत नसला, तरी आचाराच्या दृष्टीनें तिच्याकडे कानाडोळा करतो आणि या बेपर्वाईचा परिणाम असा होतो की सामाजिक विषमतामूलक जी परिस्थिति शतकानुशतकें चालू आहे, तिच्या विरुद्ध एकसमयावच्छेदानें सर्व समाजांत बंड निर्माण होऊं शकत नाहीं. बुद्धि आणि आचरण यांमधील फारकत समाजांत सारखी सुरू आहे. पण ती लवकर बन्द झाली पाहिजे. हा धोक्याचा इषारा–लालबावटा– डॉ. आंबेडकरांनी परिणामकारक रीतीनें हिन्दुधर्मीयांस दाखविला आहे.

### विचारक्रांतीची आवश्यकता

आमच्या धर्माची सुधारणा करण्यासाठीं व त्या हेतूनें सामाजिक आचारांचें परिवर्तन घडवून आणण्यासाठी, ब्रह्मसमाज, प्रार्थनासमाज, आर्यसमाज, महाराष्ट्रांतील सत्यसमाज, धर्मनिर्णय मंडळ वगैरे लहान मोठ्या धार्मिक आन्दोलनांनी अलीकडे प्रयत्न केले. विवेकानंद, मिसेस बेझंट, अरविन्द घोष, कृष्णमूर्ति, ह्यासारख्या थोर विभूतींनी धर्मविचारांस नवीन उजळा देण्याची खटपट करून पाहिली; कोणी विचारास प्राधान्य दिलें तर कोणी आचाराकडे लक्ष वेधलें. परंतु आजची हिन्दुधर्मियांची अवस्था पाहिली तर असें म्हणावें लागतें कीं आम्हां सुशिक्षित म्हणविणारांची धर्मभावना बहुतांशीं केवळ नकारात्मक आहे. दुसऱ्या धर्माचे आम्ही आपणास अनुयायी म्हणवून घेत नाहीं; म्हणूनच केवळ हिन्दुधर्माच्या कक्षेंत आम्ही येतों. जातिभेदाशिवाय कोणतें बंधनकारक क्रियात्मक तत्त्व बहुसंख्य हिंदूंमध्यें आजकाल शिल्लक राहिलें आहे ? रोटी-निर्बन्ध व बेटी-निर्बन्ध ह्या भोवऱ्यांत समाज सारखा फिरत आहे. रोटीव्यवहारामध्यें सामान्यत: शहरामध्यें बरीच देवाण-घेवाण झालेली आहे. तीहि व्यक्तिदृष्ट्याच पुष्कळ प्रमाणांत घडून आलेली आहे. कुटुंब-जाति-समूहदृष्ट्या रोटी-व्यवहार सरसहा अनिर्बन्ध चालू आहेत असेंहि दिसत नाहीं. पण बेटीव्यवहार मात्र तसाच शतकानुशतकें कायम आहे. अपवादभूत बदल क्वचितच झालेला दिसतो. पण अशा अनेक अपवादांनी जातिभेदमूलक विवाहसंस्थेत परिवर्तन झालेलें नाहीं. जातीच्या चिरेबंदी कुंडांत सर्व हिंदू समाज विभागला गेला आहे. कुटुंब, जाति व धर्म या त्रयीच्या मान्याखालीं व्यक्तिस्वातंत्र्यास वाव आहे कोठें ? सुधारकाचें त्याच्या जातींतील व कुटुंबांतील इभ्रतीचें स्थान सुधारणेची जिद्द दाखविल्यास नष्टच झाल्यासारखें दिसेल. समाजांतहि त्याला मान मिळत नाहीं व घरींहि त्याला कोणी विचारीत नाहीं. अशी त्याची अवस्था असते.

पाश्चात्य समाजांत–पारलौकिकता, गूढवाद, ग्रांथिक पवित्रता, अलौकिक समजल्या जाणाऱ्या विभूतींची पूजा ह्या निष्ठा गेल्या चार-पांच शतकांत हळूहळू कमी झाल्या आहेत. ह्याचें कारण विज्ञानाची प्रगति, शास्त्रीय विचारसरणी, राष्ट्रवाद, समाजवाद, साम्यवाद यांचा प्रसार हें आहे. पाश्चात्य विचारसरणीचे असे हें पडसाद हिंदुस्थानांतील सुशिक्षितांवर होणेंच क्रमप्राप्त आहे; कारण जग यांत्रिक सुधारणेमुळें अधिकाधिक जवळ येऊं लागलें आहे. ईश्वराबद्दलची निष्ठा किंवा पारलौकिक धारणा कमी झाल्या असल्या, तरी खऱ्या धर्माच्या भावना म्हणजे नीतिबंधनें व शीलाबद्दलची जागरूकता पाश्चात्य समाजांत ओहोटीस लागली आहे असें म्हणतां येणार नाहीं. गेल्या दोन








शतकांमध्यें देशभक्तीकरितां, समाजवाद व साम्यवाद ह्या निष्ठांकरितां स्वार्थत्याग, प्रामाणिकपणा, आत्मसमर्पण इत्यादि गुण पाश्चात्य जनतेमध्यें उद्भूत झाले. त्यानें पाश्चात्य समाजाच्या शीलाची पातळी एकंदरींत उंचावली असें म्हणणें प्राप्त आहे. व्यक्तिगत स्वार्थ कमी होऊन निःस्वार्थतेकडे बुद्धीची कसोटी लावून मन प्रगत होणें ह्यांतच मानव्याची वाढ व धर्मरहस्य सांठविलेलें आहे. हिंदुस्थानांत देखील राजकीय स्वातंत्र्यासाठीं जें उत्थान जनतेनें केलें त्यामुळें समाज उन्नतीच्या मार्गावर एकंदरींत पदक्रमण करीत आहे, असें चित्र दिसतें. परंतु सामाजिकदृष्ट्या अवलोकन केल्यास जातिभेदांतर्गत जो उच्चनीच भाव समाजांत सगळीकडे भरून राहिलेला दिसतो, त्यावर लोकाग्रणींचे प्रहार राजकीय स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नाच्या तुलनेनें कमी प्रमाणांत बसलेले आहेत. आणि त्यामुळेंच डॉ. आंबेडकरांसारख्या अस्पृश्य समाजांतील पुढाऱ्यास जातिभेद चालू ठेवणारा धर्म नकोसा होतो.

जी राज्यघटना आम्ही स्वीकारली आहे व त्या घटनेमधील सामाजिक समतेसारखीं जीं मूल्यें मान्य केलीं आहेत, त्यांच्याकडे लक्ष दिल्यास स्वातंत्र्यप्राप्तीनंतर जातिभेदान्तर्गत असमानता, अस्पृश्यतेचें उच्चाटन, स्त्रियांची आर्थिक व सामाजिक उन्नति, भंगी वगैरे जातींच्या अस्वच्छतापूर्ण धंद्यांची आमूलाग्र सुधारणा ह्याकडे समाजांतील धुरीणांनी व प्रातिनिधिक तत्त्वावर अधिष्ठित झालेल्या सरकारनें प्रथम लक्ष दिलें पाहिजे; आणि एकसमयावच्छेदानें समाजांतील हे अन्यायमूलक दोष शक्य तितक्या लवकर नष्ट केले पाहिजेत. सरकारनें आपलें लक्ष देशाच्या आर्थिक उन्नतीवर केन्द्रित केलें आहे. पण ज्यांच्यासाठी आर्थिक उन्नति करावयाची त्यांचा जीवनविषयक दृष्टिकोण लक्ष्यांत घेतल्याशिवाय आर्थिक उन्नतीचा खरा उपयोग होऊं शकत नाहीं. जीवनमान वाढविणें ही जरूरीची गरज आहे ह्यांत शंका नाहीं. परंतु कारखान्यांच्या व्यापारी शहरांत राहणाऱ्या भंगी व मजूर वर्गाचें आर्थिक उत्पन्न वाढलें आहे तरी उन्नत जीवन कसें जगावें ह्याची जाणीव त्या वर्गास नाहीं. खेडोपाडीं आर्थिक जीवनाची पातळी किंचित् वाढली आहे हें पुढें कांही काळानंतर प्रत्यक्षांत दिसलें तरी आपली राहणी म्हणजे आपलीं घरें, त्यांतील स्वच्छता, आरोग्य, खाणेंपिणें, शिक्षण, म्हातारपणची किंवा दुर्बलतेची तरतूद, लग्नकार्य, वस्त्रप्रावरण, करमणुकीचीं साधनें ह्याबद्दलचा दृष्टिकोण जोंपर्यंत बदलत नाहीं तोंपर्यंत अधिक पैसे पदरीं पडले तरी जीवन सुधारण्याची आशा नाहीं. आर्थिक प्रश्नाबद्दलचा विचार आयुष्यांतील सर्व घटनेमध्यें प्रमुख आहे असें गृहीत धरलें तरी विशिष्ट विचारसरणीमुळेंच सुधारलेल्या आर्थिक परिस्थितीचा अधिक फायदा मिळण्यासारखा आहे हें कबूल करावें लागेल. म्हणून सामाजिक विषमतामूलक अन्याय व त्याला कारणीभूत होणारी विचारसरणी हीं बदलविणाऱ्या क्रियेवर सर्व विचारी लोकाचें लक्ष्य एकवटलें पाहिजे. आपल्या समाजाची विशिष्ट घडण लक्ष्यांत घेतां आर्थिक क्रांतीपेक्षां सामाजिक विचारक्रांतीची अधिक जरूरी स्वातंत्र्योत्तर काळांत आहे. ही वैचारिक क्रांति घडून येत नाहीं ह्याचा प्रत्यय व पुरावा हा दिसेल की स्वातंत्र्यप्राप्तीनंतर जन्मजात जातिभेदाचा फायदा प्रातिनिधिक सत्तालोलुपतेच्या दृष्टीनें घेतला जात आहे. जातीचा विचार कमी झालेला नाहीं, उलट बहुसंख्य समाज ज्यांत अंतर्भूत झालेला आहे अशा जाती प्रातिनिधिक सत्ता त्या जातीमध्यें केन्द्रित झाल्यामुळें अभिमान, अभिनिवेश व प्रौढी बाळगीत आहेत. समाजांतून जातीचें निर्मूलन व्हावें हा विचार बळावण्याऐवजी अधिकाराच्या हावेमुळें जातींचा विचार अधिक










प्रबळ होऊं पाहत आहे कीं काय ही शंका वाटते. आणि हिंदुस्थानांत प्रातिनिधिक तत्त्वविचारांमध्यें प्रगति व्हावी अशी ज्यांस घाई आहे, त्यांना हा चिंतेचा विषय आहे. प्रातिनिधिक पद्धति व जातिभेद ह्या घटना परस्परविरोधी आहेत हें स्पष्ट आहे. आणि प्रातिनिधिक पद्धति यशस्वी करावयाची तर जन्मजात जातिभेद शक्यतितक्या लवकर नष्ट होणें अत्यंत जरूरीचें आहे हें कोणाहि विचारी मनुष्यास मान्य होण्यासारखें आहे.

## बुद्धधर्म-स्वीकाराचा संभाव्य परिणाम

डॉ. आंबेडकर, सध्यां धर्मविचारांस शैथिल्य आलें आहे तरीदेखील धर्मास महत्त्व अशासाठीं देत असले पाहिजेत कीं, हिंदुधर्मांतील जातिभेदाचें समर्थक असें सामाजिक तत्त्वज्ञान तो धर्म बदलविल्याशिवाय नष्ट होऊं शकत नाहीं अशी त्यांची अनेक वर्षांच्या विचारानें व समाजनिरीक्षणानें खात्री झाली. सामाजिक अस्पृश्यता नष्ट होत आहे हें त्यांना प्रतीत होत नव्हतें असें नाहीं. पण जातिभेद लवकर लोप पावतील व अस्पृश्य समाज हिंदुधर्माच्या छत्राखालीं दुसऱ्या स्पृश्य जातींत समाविष्ट होऊं शकेल अशी उमेद डॉ. आंबेडकरांस वाटली नाहीं; व कोणाहि दुसऱ्या समाजसुधारकास अशी भविष्यकालीन आशा उद्दीपित करीत नाहीं. अशा परिस्थितींत धर्मपरिवर्तनाशिवाय अस्पृश्य समाजास गत्यंतर कोणतें आहे ? जितक्या जितक्या अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या जाति बुद्धधर्मांत दाखल होतील, तितक्या तितक्या प्रमाणांत त्यांचा जातिभेद कमी होण्याचा संभव वाटतो. अस्पृश्य जातीहि आपसांत विवाह करण्यास सध्यां तयार नाहींत. परंतु बुद्धधर्मस्वीकारानें ह्या जाती आपापसांत विवाह करण्यास तयार होऊं शकतील, त्यांच्या रूढी व परंपरा बदलविण्यास साहाय्य मिळेल, नवीन तत्त्वज्ञान त्या जातींच्या अंगवळणीं पडेल, जातिभेदनिर्मूलक विचारसरणी त्यांच्या रक्तांत कालपरत्वें भिनल हें संभवनीय व शक्य आहे. ईश्वर, परलोकांसंबंधी नानाविध भावना, कर्मसिद्धान्त ह्याबद्दलच्या विचारसरणीचा त्याग बुद्धधर्मस्वीकारानें हळूंहळूं घडून येणें अपरिहार्य आहे. जातिभेदाच्या निर्मूलनास ही अनुकूल परिस्थिति आहे. हिंदुधर्माच्या कक्षेच्या बाहेर जातिभेद न मानणारा, विवाहसंस्थेच्या काट्याकुट्याचें रान साफ करणारा एक मोठा समाज हिन्दुस्थानांत तयार होऊं शकेल. ज्यांना जातिभेद नको आहे, त्यांनी बुद्धधर्माचा स्वीकार केला म्हणजे त्यांचें काम होईल. डॉ. आंबेडकरांस हें अभ्यास करून स्पष्ट प्रतीत झालें कीं बुद्धधर्म हा जातिभेदनिर्मूलक आहे. त्यांतील तत्त्वज्ञान आजच्या विचारी मनुष्याच्या सामाजिक जीवनांत बाधा उत्पन्न करणारें नाहीं. त्या धर्मांत आंधळया श्रद्धेची गरज शक्य तितक्या कमी प्रमाणांत आहे. तो धर्म आधुनिक विज्ञानाच्या विरुद्ध नाहीं. नीतिमत्तेस उचलून धरणारा तो धर्म आहे.

२५०० वर्षांपूर्वी ब्राह्मणी धर्माचें एक परिणत स्वरूप, सुधारणा किंवा हिंदुधर्माची एक शाखा म्हणून गौतम बुद्धाने चिंतन, मनन, निदिध्यास व तपश्चर्या करून आपली धर्मविचारसरणी ठाम निश्चयानें पुढें मांडली. अनेक विद्वानांनी ती विचारसरणी त्यावेळीं मान्य करून गौतम बुद्धाच्या धर्माचें अनुयायित्व पत्करलें. अनेक देशांत तो धर्म साम्प्रत काळीं सुरू आहे. डॉ. आंबेडकरांची ही श्रद्धा होती कीं, जातिभेदनिर्मूलनाचें कार्य ह्या धर्मानें घडून येऊं शकेल आणि आधुनिक काळांतील विचारी लोकांस त्या धर्मांतील विचारसरणी मान्य करविणें सुलभ आहे. हिंदुधर्मीयांमधील धर्मविचारांबद्दल कळकळ बाळगणाऱ्या विचारकांसहि ह्या जातिभेदनिर्मूलक अहिंसाधर्मास हिंदुधर्माची एक प्राचीन शाखा म्हणून किंवा सद्यःकालीन उपयोगी










पडणारी सुधारलेली धर्मविचारसरणी म्हणून तिला मान्यता देणें अशक्य नाहीं. त्यांना आपल्या स्वत:च्या धर्माबद्दल हा नवीन दृष्टिकोन बनविणें कठीण नाहीं. जातिभेद नष्ट करून राज्यघटनेमध्यें समाविष्ट केलेल्या प्रातिनिधिक तत्त्वविचारांस आचरणाचा पाठिंबाहि हा नवीन दृष्टिकोन पत्करून देतां येईल.

डॉ. आंबेडकरांनी हजारों अनुयायांस बरोबर घेऊन हिंदु धर्मास अत्यंत निगडित असलेल्या बौद्ध-धर्माचा स्वीकार केला. ही घटना धर्मदृष्टीनें अनन्य-साधारण आहे. ख्रिश्चन-धर्मीयांची लोकसंख्या गेल्या दोन तीन शतकांत हिंदुस्थानांत पुष्कळ फुगलेली दिसेल. परंतु डॉ. आंबेडकरांचा बौद्धधर्मस्वीकार ख्रिस्तीधर्मानुयायांच्या तुलनेनें अनेक दृष्टीनें भव्य वाटतो. इस्लामला जे कोटयवधि अनुयायी हिंदुस्थानांत गेल्या हजार वर्षांत मिळाले त्याची चिकीत्सा ह्याप्रसंगीं करण्याची जरूरी नाहीं. म्हणून विचारी हिंदूंनीं ही चिंतनीय समस्या कोणत्याहि अर्थानें घृणास्पद, निंदाव्यंजक, दोषपूर्ण न मानतां आपल्या समाजांतील जातिभेदमूलक घोर अन्याय सद्य:स्थितींत नष्ट करण्यास जिव्हाळयानें प्रवृत्त होणेंच इष्ट ठरेल.

### अनुयायांची जबाबदारी

डॉ. आंबेडकरांच्या अनुयायास नम्रपणें हें सुचवावयाचें आहे कीं, मोठ्या थोर विभूतीच्या मागें मेंढरांप्रमाणें लागावें, आपली कुवत व सामर्थ्य न अजमावतां केवळ भक्तिभावानें त्यांच्या चरणीं विलीन व्हावें, थोर विभूति अस्तंगत होतांच उदासवाणें जीवन जगावें किंवा शिकवणीचा बहुतांशीं विसर पडावा अशी निर्बुद्ध परंपरा हिंदुस्थानवासियांनीं कित्येक शतकें चालू ठेवलीं आहे. ह्या प्रातिनिधिक राज्यसत्तेच्या काळांत तरी विभूतिपूजा हेंच सर्वस्व न मानतां डॉ. आंबेडकरांनीं हिंदुधर्मीयांची सुधारणा व्हावी ह्या हेतूनें हिंदुधर्मास संस्कृतिदृष्ट्या अत्यंत जवळ असलेल्या धर्माचा अंगीकार केला. ह्या विशाल समस्येमधील तत्त्व आत्मसात् करून नवधर्मप्रचारक ते बनल्यास डॉ. आंबेडकरांच्या जन्मभर सोसलेल्या कष्टांचें व तपश्चर्येचें चीज झालं असें म्हणतां येईल. निदान त्यांनीं हिंदुधर्माच्या छत्राखालीं जातिविषयक उतरंडीमध्यें एक नवीन बौद्ध-अस्पृश्य ही जात बनूं न देण्याचा कटाक्ष बाळगावा. ज्याप्रमाणें हिंदु व शीख, जैन व वैष्णव हे कोठें कोठें भारतीय कुटुंबांत एकत्र आलेले दिसतात, त्याप्रमाणें बौद्ध, हिंदु, ख्रिश्चन आदि धर्म एका परिवारांत नांदत आहेत आणि धर्म ही वैयक्तिक भावना समजली जात आहे, असें जरी नजीकच्या काळांत चित्र दिसलें नाहीं तरी जातीची संख्या वाढण्याची अनिष्टता टाळणें मात्र अत्यंत जरूरीचें आहे.

शेवटीं Aldous Huxley यांनीं 'The First & Last freedom' ह्या पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत जो उतारा घेतला आहे त्याकडे लक्ष वेधणें जरूर आहे.

" There is hope in men, not in society, not in systems, organized religious systems, but in you & me. " Organized religions with their mediators, their sacred books, their dogmas, their hierarchies and rituals offer only a false solution to the basic problem. " When you quote the Bhagwad Gita or the Bible or some Chinese sacred book, surely you are merely repeating; are you not ? And what you are repeating is not the truth. It is a lie; for truth cannot be repeated. "

श्री. चा. अ. दाभोलकर

# अस्पृश्यता अर्थमूलक आहे काय?

## सामाजिक कीं आर्थिक प्रश्न

"आम्हा अस्पृश्यांना पंढरपूरचें देवळांत प्रवेश नाहीं मिळाला तरी चालेल. पण आमची आर्थिक दुरवस्था प्रथम दूर झाली पाहिजे. गेल्या यात्रेचे वेळीं मी बुलनचे कपड्यांत पंढरपूरला गेलों होतो. माझ्या जातीची जरासुद्धां चौकशी न होता त्यावेळीं मला थेटपर्यंत प्रवेश मिळाला होता" ... त्यावेळीं पंढरपूरचें मंदिर हरिजनांना खुलें व्हावें म्हणून साने गुरुजींचें उपोषण चाललें होतें. त्याबद्दल खोलीवर चर्चा चालली असतां माझ्या हरिजन 'रूममेटनें' वरीलप्रमाणें विचार प्रदर्शित केले होते. आणि डिसेंबर महिन्याचे नवभारतचे अंकांत "अतिपूर्वेकडील प्रदेशांतील अस्पृश्यता" हा श्री. हर्बर्ट पासीन यांचा लेख वाचतां वाचतां वरील उद्गार आठवून "अस्पृश्यता हा मूलतः सामाजिक प्रश्न आहे कीं आर्थिक प्रश्न आहे अशी शंका निर्माण झाली व त्या अनुषंगानें सुचलेले विचार तज्ज्ञांचें लक्ष वेधण्यासाठीं पुढे मांडीत आहे.

## न पटणारी उपपत्ति

प्राचीनकाली भारतीय आर्यांची, विजेत्यांच्या उच्चजाती व पराजीत अनार्यांच्या अगर डॉ. आंबेडकरांचे म्हणण्याप्रमाणें Broken man चें– नीच जाती असें वर्गीकरण पडून त्याप्रमाणें समाजोपयोगी व आवश्यक परंतु अप्रिय असे घाणेरडे धंदे नीच जातींचे माथी तलवारीचे धारेनें मारले गेले व कालगतीनें त्यांतूनच आजची अस्पृश्यता जन्माला आली ही अगर या सदृश उपपत्ति बुद्धीला पटत नाहीं. कारण त्यांत इतिहासाप्रमाणें इतके कठोर जाति-निर्बंध पराजितांवर लादणाऱ्या त्या आर्यांचे गेल्या चारपांच हजार वर्षांचे कालांत अनेक परकीयांकडून पराजय झाले व प्रसंगीं त्या आर्यांचा धर्मसुद्धां नामशेष होऊन त्या जागीं ख्रिस्ती धर्मासारखा धर्म स्थापित होऊनहि या जातिव्यवस्थेंत उलथापालथ झालेली दिसत नाहीं. अगर अशा विजेत्यांचा भारतीय समाजांत उच्च जातीमध्ये समावेश झालेला पण आढळून येत नाहीं. उलट, ज्याला अस्पृश्यता असें समजलें जातें ती संस्था भारतापासून जपान पर्यंतच्या सर्व पौर्वात्य देशांत आढळते आणि हें देश आर्य व मंगोलियन या भिन्न भिन्न वंशाचे आहेत. तर आर्यवंशाच्या भारताबाहेरील शाखांत आपणाला अस्पृश्यता आढळत नाहीं. त्या शाखानींहि इतर वंशाचे लोकांवर त्या लोकांना गुलामगिरींत डांबण्याइतकें वर्चस्व प्राप्त करून घेतलें होतेंच. त्यामुळेंच या सर्व पौर्वात्य देशांना समान पण त्याच वंशाचे इतर देशांनाहीं भिन्न असलेली दुसरी कोणती तरी परिस्थिति अस्पृश्यतेचे मुळाशी असावी असें वाटूं लागते. त्या दृष्टीनें भारतापासून जपानपर्यंतचे देशांत अस्पृश्यता अस्तित्वांत असल्याची माहिती मिळते. (चीनबद्दलची माहिती लेखकाला उपलब्ध नाहीं.*)

* चीनमध्यें अस्पृश्यता नाहीं. का. सं.

## शेतीवर आधारलेले 'स्थिर' समाज

या सर्व देशांचे बाबत एक गोष्ट चटकन लक्षांत येतें कीं त्या सर्व भूभागांत जगांतील विद्यमान संस्कृतींतील सर्वांत प्राचीन संस्कृती आढळतात. या








भूभागांची आर्थिक व सामाजिक घडी ही फार प्राचीन असून गेल्या अनेक शतकांत तिच्यांत महत्त्वाचे फेरफार झालेले नाहींत. तसेंच जवळ जवळ गेल्या शतकापर्यंत आज अनेक शतकें हा भाग आर्थिकदृष्ट्या संपन्न व सधन भूभाग होता व येथील समाजरचनेंत आर्थिक अरिष्टें व तत्जन्य सामाजिक उलथापालथीचा अभाव होता. साहजिकच येथील समाजजीवन हें फार संथ व साचेबंद असल्यामुळें त्यांतील वेगवेगळ्या समाजघटकांचें भिन्नत्व स्पष्ट व रेखीवपणें व्यक्त झालें. उलट, या भूभागाशिवायचें मानवी जगतांत म्हणजे मध्य आशिया व युरोप आफ्रिकेंत सामाजिक व आर्थिक दृष्ट्या इतकी स्थिर परिस्थिति निर्माण न झाल्यामुळें इतकें रेखीव वर्गीकरण होऊं शकत नाहीं. वैज्ञानिक परिभाषेंत बोलावयाचें तर युरोप व मध्यपूर्वेतील अस्थिर परिस्थितींनें जे सामाजिक घटक ‘ वर्ग ’ या amorphous स्वरूपांत प्रगट झाले तेच या पौर्वात्य देशांतील स्थिर परिस्थितींत ‘ वर्ण ’ या crystalline स्वरूपांत प्रगट झाले.

## जाति व वर्ग

त्या दृष्टीनें ‘ जाति ’ व ‘ वर्ग ’ या दोहोंमधील साम्य पहाण्यासारखें आहे. कांहीं युरोपियन देशांतील स्वानुभवावरून आजचे घडीलाहि दोन भिन्न वर्गाचे ( Class ) व्यक्तींचा रोटी बेटी-व्यवहार युरोपमध्येंहि फारसा सुकर नाहीं असें माझें निरीक्षण आहे. किंबहुना मी असेंहि म्हणूं शकतों कीं आपल्याकडे ज्याप्रमाणें ब्राह्मण इनामदार व त्याच गांवचा झाडूवाला महार हे एके ठिकाणी जेऊं शकत नाहींत; त्याचप्रमाणें तिकडेपण गांवचा जमीनदार व झाडूवाला एका पंगतीला आढळणार नाहींत. अर्थात् तिकडील हा फरक सामाजिक कारणापेक्षाहि आर्थिक कारणांनीं असतो हें जितकें स्पष्ट दिसूं शकतें तितकें तें आपल्याकडे दिसत नाहीं हें जरी खरें असलें तरीं आपलेकडील रोटी-बेटी-बंदी बाबतची मूळ सुरुवांत आर्थिक कारणामुळें झाली असणें अशक्य नाहीं येवढें मान्य करणेस हरकत पडूं नये.

## श्री. पासीन यांची व्यवसाय-यादी

त्या दृष्टीनें श्री. पासीन यांनी दिलेली पौर्वात्य देशांतील हरिजनांचे उद्योगांची यादी लक्षांत घेण्यासारखी आहे. उदाहरणार्थ मेलेल्या जनावरांची वासलांत, त्यांचे चामड्याच्या वस्तू तयार करणें, साफसफाई, यासारख्या स्वरूपाचीं हीं कामें आहेत. आणि शेतकीप्रधान समाजव्यवस्थेंत हीं सर्व कामें करणारे समाजघटक आर्थिकदृष्ट्या परावलंबी व म्हणून खालच्या दर्जाचे राहणार हें उघड आहे. कारण या व तत्सम इतर धंद्यांकरता लागणारा कच्चा माल हा शेतकरी-समाजाकडूनच प्राप्त होणारा असतो; इतकेंच नव्हे तर या धंद्याच्या उत्पादनाचें गिऱ्हाईकहि प्रामुख्यानें शेतकरी समाजच असतो.

या दृष्टीनें श्री. पासीन यांचें “ हीं सर्व कामें रक्त, मृत्यु व घाण यांचेशी संबंधित असल्यानें व हे व्यवसाय आवश्यकच असल्यानें, ते या समाजघटकांवर प्राचीन कालापासून लादले असावेत ” हें मत फारसें पटत नाहीं. भारतीय आर्यसंस्कृतीला तर बौद्धकालापर्यंत यज्ञयागाचे वेळीं बरेच प्राणी कापावे लागत. व हें काम करणारे लोक त्यावेळींहि उच्च वर्णांतच मोडत. शिवाय मृत जनावरांची वासलांत लावणें, वगैरे सारखीं कामें जरी कोणत्याहि समाजघटकांनीं केली नाहींत तरी देखील शेतकी संस्कृतींत निसर्ग त्यांची दखल सहज व समाजाला सोयीची पडेल अशा मार्गानें घेऊ शकतो. श्री. पासीन यांना प्रश्न पडलेला ‘ भंगी ’ कामाचा व्यवसाय हा भारतामध्यें बहुश: निसर्गावर सोपवला जात असलेनें तो व्यवसाय करणारे लोक समाजाला फारसे आवश्यकच वाटत नसत; साहजिकच त्यांना निकृष्टावस्था प्राप्त झाली. उलट, जपानमध्यें जना-

वराचे अभावानें " सोनखताची " किंमत पूर्वापार जाणली गेली होती, त्यामुळें तेथील शेतीला आवश्यक असलेला इतका महत्वाचा पदार्थ निर्माण करणारा भंगी हा अस्पृश्य मानला जाऊं शकत नाहीं. याहिपेक्षां ज्यास्त मजेदार उदाहरण आपलेकडील रामोशांचें घेतां येईल. वस्तुतः प्राचीन गांवगाड्यांत रामोशांकडे रक्त, घाण वगैरेशीं संबंधित असें कोणतेंच काम नसून रखवालीचें काम त्याचेवर सोपवलें होतें; पण तरीहि या कामावर त्याला राजसत्तेनें नेमलें नसून गांवगाड्यानें नेमलें असल्यानें त्याला राजदूताचा मान न मिळतां खालचा दर्जाच पत्करावा लागला. आजचें उदाहरण हवें असेल तर राजसत्तेचें पाठबळ असलेल्या पोलिसांचा मान आपण गुरख्यांना देत नाहीं. शतकानुशतकें हीच परिस्थिति अबाधित राहून आजचे गुरखे जर वंशपरंपरागत येथेंच स्थायीक झाले तर त्यांची पण रामोशांसारखी परिस्थिति होणें अशक्य नाहीं.

### संपत्तीची उपभोगपद्धति

किंबहुना अस्पृश्यतेची अनुवंशिकता व त्यांचे सामाजिक चालिरीतींवरील निर्बंधहि वंशपरंपरागत संपत्तीचा उपभोग घेण्याचे परिस्थितींतूनच निर्माण झाले असण्याची शक्यता आहे. समाजांत उपलब्ध असलेल्या उत्पादनसाधनांवर एकदां अनुवंशिक मालकीहक्क प्रस्थापित होऊन तो ठराविक कायद्यांचे चाकोरींतून अमलांत आणला जाऊं लागला कीं, आधीच गरीब असलेल्या वर्गांतील लोकांना वरचे गटांत प्रवेश करणें मुष्कील होऊं लागतें व परिणामतः त्यांचें दारिद्र्य व सधन वर्गावरील अवलंबिकता जास्तच वाढते. या नियमाप्रमाणेंच आजचे हरिजनांना त्यांचे पूर्वजांचेच आर्थिकदृष्ट्या परावलंबी व म्हणून कमी उत्पादक धंदे वंशपरंपरा करावे लागत असले जाण्याचीच शक्यता ज्यास्त आहे. अशाप्रकारें शेतकीप्रधान अर्थव्यवस्थेंत दुय्यम दर्जाचे धंदे पिढ्यानुपिढ्या करणें भाग पडल्यानें त्यांना दारिद्र्य व सामाजिक लाचारी प्राप्त होणें अपरिहार्यच आहे. हरिजनावर घातले गेलेले सामाजिक निर्बंधहि यांतूनच निर्माण झाले असण्याची शक्यता आहे. या समाजाची आर्थिक कुवत मर्यादित असतांना जर त्यांतील कोणी इसम डामडौल करूं लागला तर त्यानें ती संपत्ति समाजाला मान्य नसलेल्या इतर कोणत्यातरी मार्गानें मिळवली असणार असें गृहीत धरलें जाणें व त्यानुसार त्या व्यक्तीला शासन होणें अस्वाभाविक म्हणतां येणार नाहीं तसेंच विहीर, मंदिर वगैरे सारख्या पैसा खर्चून निर्माण करावयाच्या गोष्टींना लागणारा पैसा सर्वसामान्यपणें गरीब असलेल्या या समाजाकडे नसल्यानें त्या कामासाठीं आपले खिशांतून पैसा खर्च करणारा इतर समाज या लोकांना त्या गोष्टींचा उपभोग घेऊं देत नसला तर तेंहि विसंगत म्हणतां येईल काय ?

### आर्थिक उपपत्तीच योग्य

मग म्हणूनच माझें असें मत होऊं लागलें आहे कीं अस्पृश्यतेचें आदिकारण वांशिक अगर सामाजिक नसून तें आर्थिक आहे. व शेतकीप्रधान समाजव्यवस्थेंत आर्थिकदृष्ट्या दुय्यम दर्जाचे उद्योग करणारे लोक संपत्तीचे वंशपरंपरागत वारसा पद्धतीमुळेंच कालांतरानें हरिजन ठरविले गेले. अर्थात माझें हें मत बरोबरच आहे असा आग्रह नाहीं. परंतु विचारवंतांनीं त्याबाबत मतप्रदर्शन करून त्याचें ज्यास्त स्पष्ट विवरण करावें या उद्देशानें तें या ठिकाणी मांडलें आहे.

---










श्री. उमाशंकर जोशी

# ‘ हलक्या कर्मांचा मी नरसी ’

[ ‘ संस्कृति ’ मासिकांत ( मार्च १९५५ ) प्रसिद्ध झालेल्या “ हळवां कर्मनो हुं नरसैंयो ” या नाटिकेचा हा अनुवाद डॉ. ना. ग. जोशी ( बडोदें ) यांनीं केला आहे. ]

## दृश्य १ लें

स्थळ : जुनागड शहराबाहेर अशोकाच्या शिलालेखांच्या बाजूचा रस्ता.

[ दुरून धिम्मा टाळांचा स्वर, मधूनमधून चिपळयांचा आवाज, आणि ‘ गिरितळाटी ने कुंड दामोदर त्यां मेहताजी नावा जाय ’ – गिरिपायथा नि कुंड दामोदर तेथें मेहता स्नाना जाय ’ – या चरणाचें गुंजन. ]

काळपुरुष : ( जरा घोगऱ्या गंभीर आवाजांत ) : ही ... नरसी मेहतांची मंडळी गिरिनारच्या पायथ्याशीं दामोदर कुंडांत स्नान संपवून येत आहेतसें दिसतें. आतां येथें येऊन पोंचतील.

[ दुरून टाळ व चिपळया यांची धून. मधूनच वारंवार ‘ गिरितळाटी ने कुंड दामोदर ’ हा अर्धा चरण ऐकूं येतो. ]

केवढा गोडवा नरसिंह मेहता रोज सकाळीं वर्षवीत असतात. मी काळपुरुष येथें जुनागडमध्यें गिरनारच्या पायथ्याशीं अशोकाच्या शिलालेखांत दाटलेला अनेक शतकें पडून आहे. रुद्रदामन् आणि स्कंदगुप्त यांचीं अक्षरें माझ्या छातीवर कोरलेलीं आहेत; आणि राजर्षि अशोकाचा अहिंसा व बंधुभावाचा उपदेश माझ्या हृदयांत धबकत-धडधडत आहे. पण या संत नरसीला पाहून वाटतें कीं जणुं तो धर्मसंदेश साक्षात् मानवदेह धारण करून विहरत आहे.

**मतिराम :** कोण बोललें हें ? हा अशोकाचा दगड बोलला का ? दीड शहाणा कुठला ! तुला वाचा दिली आहे या मतिराम पंडितानें. तुझ्यावरचे लेख मी वाचून दाखविले नसते तर तुला कोण ओळखणार होतें ? काळपुरुष आलाय मोठा, पाहिलाच नाहीं जसा कांहीं ! लाथ खायचा विचार दिसतो आहे ! घे ( खडावांनीं दगडावर प्रहार करतो ) घेऊन जा ! ( पुन्हा खडावांनीं प्रहार करतो. ) बस्स् ! आतां शहाणा असशील तर तोंड बंद करून पडून रहा. ब्राह्मणांमध्यें सर्वश्रेष्ठ अशा आमच्या नागरज्ञातींत दगड निपजलाय हा नरसी मेहता – त्याला तुझ्यासारख्या धोंड्यावाचून वाखाणील कोण ? ( खडावा चटचट् वाजवीत चालतो. ) अरे, कोण आहे तें ? हो दूर, बाजूला हो ! ( स्वतः एकदम मागें हटतो. खडावांचा खडखडाट. ) आतां माझी सावली तुला शिवतां शिवतां राहिली !

**गोविंद :** ( ओशाळा बनतो, पण मग लगेच स्वस्थ होऊन हसूं लागतो ). पुजारी बाबा, आम्ही पावन होतां होतां राहून गेलों असेंच म्हणा ना.

**मतिराम :** पण माझें काय ? तुम्ही हलक्या वर्णाचे काय समजणार ? माझी आजची जन्माष्टमीची सगळी पूजा बिघडली असती ना ! पायथ्याहून भवनाथाची पूजा करून आलों आहे अन् शहरांत भांगनाथ भगवान् वाट पाहात असेल !

**गोविंद :** ए माधा, कुवेर, रामा, लखमी–सगळे बाजूला व्हा. मतिरामबाबांना वाट करून द्या.

**मतिराम :** ( वेडावीत ) माधा ! रामा ! लखमी !! –अरे गोविंद, तुम्ही हलक्या जातीच्या लोकांनीं








देवांचीं नांवेंहि बाटविलींत तर ! ( तिरस्कारानें ) लक्ष्मी कुठली रे ? चुल्यांतली राखाडी ! राखाडी ! समजलास ? आणि माधू, रामा, गोविंद यांच्या ऐवजीं कचरा, पुंजा, धूळा अशीं नांवेंच शोभतात तुम्हाला. ( तिरस्कारानें ) आणि तुम्ही सगळे या वेळीं कुठें धाड मारतां ?

**गोविंद :** पुजारीबाबा, तर मग आपणहि आजच्या पर्वासाठींच निघालां तर ! मनांत आलं कीं गोकुळअष्टमीचं पर्व आहे तेव्हां वाटेवर जाऊन उभं राहावं आणि भक्तराजांचें दर्शन घ्यावं नि जमल्यास त्यांना......

**मतिराम :** कोणाचं ? त्या नरसैंयाचं ?

[ ' गिरितळाटी ने कुंड दामोदर ' ही ओळ, दूर टाळ नि चिपळयांच्या सुरांत, ऐकूं येते. ]

**गोविंद :** होय, बाबा, नरसी मेहतांचें. आपल्या सारख्या मोठ्या माणसांना भगवंताचें दर्शन घडायचें. आम्हां सारख्यांना भगवंताच्या भक्ताचें दर्शन झालें तरी बस्स.

**मतिराम :** ( चिडून ) भगवंताचा भक्त ! भगवंताचा भक्त केव्हांपासून झाला हा ? दंभी, खोटा ! बढाई मारतो कीं गोपनाथ भगवानानें प्रसन्न होऊन कृष्णाची रास दाखविली ! लुचा ! भावजयीनें 'तुझ्यापेक्षां धोब्याचा दगड बरा ' असा टोमणा मारला म्हणून जंगलांत जाऊन दडून बसला आणि पक्का शठ माणूस भगवंताचा साक्षात्कार झाल्याचें सोंग करून गांवांत परत येऊन सगळयांच्या गळयांतला ताईत होऊन बसलाय ! पाहतों ! गांवांतून याची हकालपट्टी केली नाहीं, याला जंगलांत दडून बसावं लागलं नाहीं, तर माझं नांव मतिराम पंडित नव्हे !

**गोविंद :** पुजारी बाबानूं ? असं व्हं कसं बोलतां ? आम्हाला तर भक्तराज डोळयांतल्या बाहुलीसारखे आहेत. आज त्यांना आमच्या वाड्यांत घेऊन जायला आम्ही सगळे येथें आलों आहोंत. घेऊन गेल्यावांचून आम्ही राहणार नाहीं.

**काळपुरुष :** जंगलांतच त्याचें मंगल होतें. पण भगवंत ज्याला आपला म्हणून स्वीकारतो त्याला सत्याच्या कसोटीवर पारखण्यासाठीं भरवस्तींत राहायची आज्ञा करीत असतो.

**मतिराम :** ( चिडून ) बोललास का ? ( हळूहळू जणूं आपल्या मनांतच बोलतो. ) ठीक, चांगला मोका आहे. यालाच हाताशी धरूं या जरा चिडवून. नरसी राहील धेडवाड्यांत जन्मभर... ( मोठ्यानें ) गोविंद भगत, हें आपलं तुझं मन पाहायला जरासं बोललों. ( जीभ अडत असतां ) नरसैंयासारखा या जुनागडच्या भुईवर कोणी झाला नाहीं. ( जरासं खांकरून ) तुम्ही सगळे टोळकं करून आलांत तेव्हां वाटलंच मला कीं हे लोक नक्कीच नरसी भगताला धेडवाड्यांत घेऊन जाणार.

**गोविंद :** ( खुष होऊन ) अरे माधा, पाहिलंस ? पुजारी बाप्पांनीं आपल्या मनांतली गोष्ट ओळखली ती ! नव्हतों सांगत मी,—मतिराम बाप्पांसारखे कोणी विद्वान नाहींत या दुनियेंत ? बाप्पा, पण भक्तराज मानतील आमचं म्हणणं ?

**मतिराम :** ( आनंदून ) कां नाहीं मानणार ? योग फार चांगला आहे. ' धन, मकर नि कुंभ, मांजर करी धामधूम'— हो अति उत्तम योग आहे.

**गोविंद :** आशीर्वाद आपला ! भक्तराजांनीं आमचें आंगण पावन केलें म्हणजे आमच्या चौऱ्यायशीचा फेरा टळलाच समजा !

**माधा :** अरे गोविंदा, तुझ्या लोभाला कांहीं हद्द आहे कीं नाहीं ? येथून दुरून भक्ताचें दर्शन घडतें तें काय कमी आहे ?

**गोविंद :** नाहीं, मी तर आपल्या वाड्यांत यायची विनंति करायलाच आलोंय आज. तुमचं मन घेत नसेल तर तुमचं तुम्ही पाहा. मी रस्त्यांत लोळण घेईन.

**माधा:** अरे, आपण हलक्या जातीचे......

**मतिराम :** खरा भक्त भाव कसा आहे तिकडे






पाहील, दुसरं कांहीं पाहणारच नाहीं. चला, सटका बाजूला, जाऊं द्या मला.

**काळपुरुष :** भक्तांच्या जीवनकार्यांत त्यांच्या विरोधकांकडूनहि मदत करविण्याची भगवंताला संवय आहे.

**मतिराम :** ( जातां जातां ) बोलला पुन्हां ? पाहा तर खरे ! दगडहि आतां बोलूं लागले आहेत ?

**गोविंद :** बाप्पा, दगडासारखीं हृदयें विरघळवायला भक्तराज मेहताजी निर्माण झाले आहेत. यावं, बाप्पा [ मतिराम जातो. ]

**माधा :** ( चिंतापूर्वक ) अरे, गोविंदा, या पुजाऱ्याच्या डोळयांत विखार आहे हां ! मेहतांचं भलं व्हावं असं वाटत नाहीसं दिसतं याला ! गांवांतून मेहताजींचा कांटा काढण्यासाठी आपल्याला कसा चढवीत होता तें पाहिलंस ना तूं ?

**गोविंद :** त्याचा मुलगा साधुराम मेहताच्या मंडळीला मिळाल्यापासून त्यानें मेहताजींवर दांत धरला आहे. पण आपण मेहतांना आमंत्रण करायलाच आपल्या वाड्यांतून सगळे आलों आहोंत. त्यानें चढवलें म्हणून आलों आहोंत थोडेच !

**माधा :** तरीपण मला वाटतं, आजचा दिवस जाऊ द्यावें.

**गोविंद :** जा रे जा, भाऊ ! आजचें गोकुळ अष्टमीचें मोठें पर्व. यापूर्वी आमंत्रण करायचे घोडे किती वेळां नाचवले ! आतां आज धीर करून द्यायचंच आमंत्रण... हे आलेच भक्तराज !

[ प्रथम चिपळयांचा आवाज एकदम जोरांत ऐकूं येतो. थोड्या वेळानें लगेच बंद होतो. नंतर ‘ गिरीतळाटी ने कुंड दामोदर त्यां मेहताजी नावा जाय’ – ही ओळ स्पष्ट खुल्या आवाजांत म्हटली जाते. मधूनमधून टाळांचा झणझणाट होतो. ]

**गोविंद :** बोला ‘ भक्तराज नरसी मेहतांकी जय ! ’

**सगळे :** ‘ नरसी मेहतांकी जय ! ’

**नरसी :** गोविंद भगत, तुम्ही सुद्धां ? जयजयकार फक्त भगवंताचा करावयाचा असतो ! बोला, ‘ कृष्ण कन्हैयाकी जय ’ !

**सगळे :** ‘ कृष्ण कन्हैयाकी जय ! ’

**गोविंद :** भक्तराज, हात जोडून विनंति आहे कीं......

**नरसी :** काय आहे, बाबा ?

**गोविंद व इतर** ( एकच वेळीं ) **:** आज रात्रीं आमच्याकडे भजनाला या.

**नरसी :** ठीक, आज रात्रीं तुमच्याकडे भजन.

**गोविंद :** फार कृपा झाली, भक्तराज.

**नरसी :** तुमची भगवंतावर श्रद्धा आहे म्हणून बोलावतां ना ? मग त्यांत कृपा कसली ? कृपा भगवंताची. पण हें पाहा, माझा ‘ चोरा ’ ( घरांतला चौक ) पाहिला आहे ना ? तसें आंगण झाडून लिंपून मंडळीला बसण्यासाठीं साफ करून ठेवा. तुळस तर तुमच्याकडे असेलच. सांज झाल्यावर आम्ही सगळी मंडळी प्रसाद बरोबर घेऊन तेथें येऊं.

**गोविंद :** प्रसादसुद्धां आणाल ?

**नरसी :** भगवंताचा प्रसाद आपण सगळे जण एकत्र सेवन करूं, त्यावांचून उत्सव पुरा कसा होईल ?

**गोविंद :** आमच्याबरोबर प्रसाद घेणार ? आम्ही हलक्या जातीचे...... !

**नरसी :** असं बोलूं नका ! तुमच्यामध्यें काय भगवंत कमी आहे नि आमच्यांत जास्त आहे ? बाबा, अशी पक्षापक्षी असेल तिथें परमेश्वर असणार नाहीं ?

**गोविंद व इतर :** नरसी मेहताकी जय !

**नरसी :** नाहीं, ‘ कृष्ण कन्हैयाकी जय ! ’

**सगळे :** कृष्ण कन्हैयाकी जय !

## दृश्य २ रें

**आवाज :** ए माणेक महेती, जरा ओटीवर ये ग !

**माणेकबाई :** कोण पुजारीणबाई का ? बोला,







काय आहे ? साधुराम पोरासाठीं आलांत का ? काय सांगूं ? मी सांगून पाहिलें, मानीत नाहीं आणि इथंच गोंधळ घालून बसतो !

**पुजारीण :** माझ्या पोरासाठीं नाहीं आलें, मी तुमच्यासाठीं आलें आहे. ऐकलंत का ?

**माणेकबाई :** काय ?

**पुजारीण :** नरसीभगत आतां भजन करायला जाणार आहे तें !

**माणेकबाई :** हो, असं दिसतं आहे खरं. सर्व मंडळी तयार झाली आहेत. माझ्याकडून प्रसादसुद्धां करवून घेतलाय.

**पुजारीण :** ते घेडवाड्यांत भजनाला जायचे आहेत. आज मी माझ्या घरीं बातमी ऐकली.

**माणकेबाई :** ( थंडपणें ) असं ? मला मेलीला कांहींच समजत नाहीं, कुठं जातात न् कुठं येतात. आपण आपलं सांगतील तसं करावं झालं !

**पुजारीण :** पण ही वेगळीच गोष्ट आहे. यांत तुम्हाला स्वत: लक्ष घालून कांहींतरी करावं लागेल.

**माणेकबाई :** काय तें ?

**पुजारीण :** काय कसलं, नरसी भक्ताला अडवून धरावं लागेल.

**माणेकबाई :** मी अडवणारी कोण ? तुम्हांला अडवतां येत असेल तर अडवा. चुलतभाऊ आहेत तुमचे. तुम्हीं आहांत न् ते आहेत.

**पुजारीण :** मला काय त्याचं ? जातगोतांत राह्यचं नसेल तर तुमचं तुम्ही पाहा. सर्वांत उच्च ब्राह्मण-वर्ण–नि त्यांत सर्वश्रेष्ठ नागरजात. भविष्यांत कधीं भांगनाथ महादेवाच्या देवळाची पायरी चढतां येणार नाहीं. माझ्या घरीं गोष्टी चालल्या होत्या त्या-वरून म्हणतें. मग म्हणाल सांगितलं नाहींस.

**माणेकबाई :** हें सगळं खरं. पण मला तर जिथं भक्तराज तिथं आम्ही. तुम्हाला हें माहीत आहे ना ?

**पुजारीण :** तुम्ही कांहींहि समजा ! तुम्हाला संसार चिकटला आहे. त्यांना काय आहे ? जात-गंगेनंहि आजपर्यंत देवाचा भक्त आहे असं मानून सहन केलें. द्वारकेंत या भक्ताची हुंडी देवानं पट-वली, मुलगी कुंवरबाईचं आजोळपण स्वतः येऊन केलं, मुलगा शामळशा याच्या विवाहांत स्वत: हजर राहून मदत केली–या सगळया चमत्कारांमुळें लोकां-नीं भक्ताला जाऊं दिलं. पण आतां मात्र हद्द झाली आहे.

**माणेकबाई :** बाई, भक्तराजाचे चमत्कार तर आम्हाला रोजच्या रोज दिसताहेत, मानाल खरं ?

**पुजारीण :** माणसं जर देवमाणसं म्हणून खपूं लागलीं म्हणजे असा भ्रष्टाकार कसा करूं लागतात ? मी तर असं म्हणतें, मेहतीजी तुम्ही भक्ताला घरांत डांबून ठेवा.

**माणेकबाई :** असं कसं होईल ?

**पुजारीण :** हं, असंच. मी घरीं जाऊन सांगतें कीं भगताला घरांत कोंडून ठेवला आहे. आमचा साधुराम येथें राहतो म्हणून त्याच्या वडिलांना राग आलेला आहे, हें तुम्हाला माहीतच आहे. मला भीति वाटते कीं हे लोक भगतांचें कांहीं वाईट तर करणार नाहींत ? [ जाते. ]

**माणेकबाई :** ज्याला देवतारी, त्याला कोण मारी ?

**समूहगीत :** ‘ गिरी पायथा अन् कुंड दामोदर तेथें मेहता न्हाया जाय्. ’

**माणेकबाई :** काय, आत्तां पुन्हां संध्याकाळीं गिरनारच्या पायथ्याशीं आंघोळीला निघालेत कीं काय ?

**नरसी :** नाहीं, नाहीं. आम्ही आपले हरिच्या भोळया लोकांनीं बोलावलं तिथें भजन करायला चाललों आहोंत.

**माणेकबाई :** कुठं ?

**नरसी :** अरे, मेहतीला कुणीं कांहीं सांगितल नाहीं का ? ‘ सती, सुंदर साध्वी, ’ अग, तुझ्या

अनुज्ञेवाचून थोडंच जायचं होतं ?

**समूहगीत :** " गिरीपायथा न् कुंड दामोदर तेथें मेहता स्नाना जाय्; धेडजातिमधिं दृढ हरि-भक्ति, प्रेमानें ते धरिती पाय्. कर जोडुनियां करिति प्रार्थना, विनतिवजा बहु वदति वचन् "

**मंडळींतील थोडे :** ( बाजूला उभे राहून, हात जोडून, हरिजनांचे प्रतिनिधि म्हणून )

महान् पुरुष ! हा अर्ज एवढा, – अमुच्या अंगणिं करा कीर्तन. प्रेम वस्तु ही अम्हा मिळूं द्या, खलुं द्या जन्म मरण जंजाळ्.

**समूहगीत :** कर जोडतांक्षणिं करुणा आली, मेहता वैष्णव परम दयाळ्.

**नरसी :** पक्षापक्षी तिथें ना ईश्वर समदृष्टीला सर्व समान्, गोमूत्र तुलसी वृक्षं ठेवून् लिंपा –
असें वैष्णवें दिलें वाग्दान्.

**समूहगीत :** गिरीपायथा न् कुंड दामोदर . . .

**माणेकबाई :** ठीक.

**नरसी :** बोल, महेती, तूंहि या साधुसाध्वीं-बरोबर येतेस का – ?

**माणेकबाई :** तुम्ही म्हणाल तसं. ( जरा हंसून ) तिथंच राहयचंय् कीं परत इथं येऊन राहायचंय् गावांत – या घरांत ?

**नरसी :** जिथं राहूं तिथं भगवंताचंच घर नाहीं का ?

**माणेकबाई :** तर मग चला.

**नरसी :** वाहवा रे माझी सती साध्वी ? पण सकाळीं भजन संपल्यावर इथेंच यायचें आहे. तूं असलीस तरच इथें येणार ना ? समाजापासून दूर जाऊन राहायचं नाहीं, दुनियेच्या मधेंच राहायचं आहे.

**माणेकबाई :** ठीक तर, राहूं द्या ?

**नरसी :** जग वाटेल तें म्हणो. आम्ही आपले मर्जेत गात-गात येथें येऊं. अरे शामळशाच्या बायकोचं दुखणं तर मी विसरलोंच.

**माणेकबाई :** तुम्हाला ' विसरणं ' ही कुठें नव्या नवलाईची गोष्ट आहे ?

**नरसी :** तूं तिची काळजी घ्यायला राहाच. चला बाबा, जाऊं या आपण – ' नारायणाचें नांऽव घेतां . . . ' ( ' नारायणनुं नामज लेतां ' . . . )

**समूहगीत :**

नारायणाचें नांऽव घेतां अडवी त्याला टाकूं रे-
कूळ टाकूं, कुटुंब टाकूं, टाकूं आई-बाप रे ।
भगिनी-सुत-दारांना टाकूं, जईं कांत टाकि साप रे
प्रथम पिता प्रल्हादें त्यजिला, नच त्यजिलें हरिनाम रे ॥
नारायणाचें नांऽव घेतां . . . [ सर्व जातात ]

**माणेकबाई :** अजून टाकायच्या गोष्टी ? तुम्हाला अडवायची हिंमत कोणाला आहे बरं !

### दृश्य ३ रें

[ शंखनाद, चिपळ्या, टाळ, मधूनमधून ' अखिल ब्रह्मांडमां एक तूं श्रीहरि ' ही धून. ]

**गोविंद :** अरे, माधा, रामा, आले रे आले ! हे आले !

**माधा :** भक्तराज आले खरे !

**गोविंद :** अरे मूर्खा, वचन देऊन आल्या-वाचून कसा राहील असा देवमाणूस ?

**नरसी :** ( अगदीं जवळ आल्यासारखे वाटतात ) ' अखिल ब्रह्मांडिं या एक तूं श्रीहरि, वेगळें रूप अनंत भासे. '

**समूह :** ( हाच चरण गातात. )

[ सर्व मंडळी आली आहेत. चिपळ्या-टाळांची धामधूम. ]

**नरसी :** या, हरिच्या जनांनो या. घ्या हा प्रसाद.

**गोविंदा :** आणा बाबा !

**माधा :** द्यावा प्रसाद !

**लखी :** घ्या सगळे प्रसाद घ्या !

**नरसी :** बेटा साधुराम, सर्व मंडळीत फिरून वांट हा प्रसाद. सर्वांनीं सेवन करा प्रसाद.

[ एकजण पखवाज वाजवायला लागतो. ]








**नरसी :** ( पायांत घुंगुर, हातांत चिपळ्या ) :

जागुनी पाहतां जगत हें ना दिसे

झोपतां विविध हा भोग भासे.

चित्त चैतन्यविलास तद्रूप हें,

ब्रह्म ब्रह्माचिया जवळि लटके.

[ दोनचार वेळां चिपळ्या–टाळांची धामधूम –सगळे एकदम उल्हासानें मेहतांच्या आसपास कोंडाळें करून टाळचिपळ्या वाजवीत भजन गात, घुमूं लागतात. तेवढ्यांत मेहतांचें दुसरें भजन सुरू होतें. ]

**नरसी :** पाहिरे गगनिं या कोण हा घुमतसे,

तोच तूं तोच तूं–शब्द बोले.

[ सर्व मंडळी भक्तीच्या नादांत नाचत व गात जातात. भजनाची धांदल चालली आहे, तेवढ्यांत हळूहळू अगदीं पुढचा पडदा पडतो.

थोडावेळ शांतता – मग तंबोऱ्याचे स्वर येतात. हळूहळू पुढचा पडदा उघडतो. पहिल्या विंगमधून उजव्या बाजूनें मेहता व त्यांची मंडळी गात गात येतात. ]

**समूहगीत :** मेहता रात्रीं आले, आणिला प्रसाद, केला बहु उत्सव् , पहांटवेटी भजन केलें, संतोषले सगळे वैष्णव. घरीं पोंचले हरियश गात, वाजत टाळ नि शंख–मृदंग, ( शंखनाद, चिपळ्या यांचा आवाज. सर्व डाव्या बाजूनें दिसेनासे होतात. नागर मस्करी करीत उभे आहेत, मेहतांची मंडळीं डाव्या अंगच्या दुसऱ्या विंगमधून येतात. )

**नागर :** हंसुनी नागर टाळी पिटितो, हेरे कसले ब्राह्मण–ढंग ?

**१ ला :** हा, हा,हा; पाहिले का हे मेहताचे चाळे ?

**२ रा :** भक्त झाला म्हणून काय झालें ?

**३ रा :** धेडवाड्यांतच राहा ना आतां ?

**४ था :** अरेरे ! गांवाचा धेडवाडा करून टाकलान् !

**५ वा :** हा धेड–नागर नरसैंयो !

**६ वा :** हा, हा, हा, हा ! ( हंसतो, दुसरे हंसण्यांत सामील होतात. )

[ उजवीकडे मंडळी निघून जातात. पडदा उघडतो. तिसऱ्या विंगमधून मंडळी आंत येतात. नागरलोक बाजूला उभे राहून हंसत आहेत. ]

**समूहगीत :** मौन धरोनी मेहता चालले,

**नरसी :** ( मनांत म्हटल्यासारखं ) ' अर्धवटांना उत्तर द्यावें अम्ही ? '

**समूहगीत :** जागे होऊनि लोक विचारिति–

**नरनारी :** मेहता असले कसले तुम्ही ? जात न जाणत, गोत न जाणत, नच विवेक-विचार.

**समूह :** कर जोडून म्हणे नरसैंयो.

**नरसी :** वैष्णव दे मजला आधार !

(सर्वांना बोलावीत) या सर्व मंडळी, मजबरोबर गा. असे रे आम्ही असेच आहों,

तुम्ही म्हणतां तसे असूं रे

भक्तिमधें जरि कष्ट म्हणाल

तरि दामोदर सेवा करूं रे !

**समूह :** तसे असूं दे अम्ही तसे रे !

[ गात-गात दिसेनासे होतात. ]

## दृश्य ४ थें

### स्थळः २ ऱ्या दृश्याचें

**मतिराम :** माणेकबाई, भगत मजेंत आहेत ना ?

**माणेकबाई :** कोण मतिराम पुजारी ? भगतांच्या शिरीं भगवंत आहे. ते आपले तीनशें न् साठ दिवस मजेंतच.

**मतिराम :** ( स्वगत, अतिशय हळूहळू ) सगळ्या गांवाला चिथवलं होतं, पण सगळे दोन शब्द बोलले, मस्करी केली, हंसले, बस्स् एवढंच. कोणींहि त्याला धोंडे मारून परत धेडवाड्यांत हाकलून दिला नाहीं. माझा बेत धुळींत गेला. आतां लाज राखायला दुसरी युक्ति अजमावली पाहिजे. ठीक. करून बघतो. भोळ्या माणेकबाईची साथ तर मिळेलच. ( मोठ्यानें ) माणेकबाई, माझ्या घरून काल रात्रीं साधुरामाची आई इथं आली होती








ती म्हणत होती कीं, भक्त घेडवाड्यांत भजनाला जाणार होते, पण तुम्ही त्यांना घरांत कोंडून ठेवलंत.

**माणेकबाई :** मी कोण त्यांना कोंडून ठेवणारी ?

**मतिराम :** तसं करावंहि लागतं. फार छान केलंत. फार उत्तम केलंत. त्यावांचून उत्तम नागर-जातीचा आपला आचार सांभाळला कसा जाईल ? ( घरांत डोकावून पाहात ) काय, अजून आंतल्या बाजूला खाटेवर भगतच निजलेले आहेत कीं काय ?

**माणेकबाई :** ते तर ......

**मतिराम :** कांहीं सांगायलाच नको. सोन्याहून पिवळं ! अशा तुमच्या सारख्या गृहिणी असल्या, तरच या कठीण कलियुगांत धर्म टिकेल ! (थोडासा चालल्यावर आळींत येऊन मोठ्यानें ) जुनागडच्या नागरांनो, सर्व नगरजनांनो, पाहा; तुम्ही म्हणतां कीं नरसी भगत घेडवाड्यांत भजनाला गेले म्हणून ना ? ते तर आपल्या घरीं खाटेवर निजलेले आहेत.

[ ' असे रे आम्ही असेच आहोंत ' असें गात गात मंडळी विंगमधून येतात, जवळून चालून, आंत चौकांत जातात. ]

**आवाज :** असं का ? मग हे आले ते कोण ?

**मतिराम :** हे पण भगत आणि घरांत निजले होते तेहि भगतच. भगत आहेत देवाचे माणूस, चमत्कारी पुरुष. असा समर्थ पुरुष जें करील तें चालेल, आपणां संसारीजनांकडून त्यांचें अनुकरण नाहीं व्हायचें.

**साधुराम :** ( मंडळींतून थांबून दूर उभा होता तो पुढें येऊन ), बाबा, क्षमा करा मला. पण तुम्ही कुणाला बनवता ? हे आमच्याबरोबर अंत्यज वाड्यां-तून आले तेच भगत. येथे घरांत तुम्ही पाहिलेत ते त्यांचा मुलगा शामळशा याची बायको तर नसेल ना ? [ सगळे हंसू लागतात ]

**मतिराम :** चूप ना आतां, दीडशहाण्या ! बेटा, साधुराम. धर्माच्या गहन गोष्टी तुला कशा कळणार ? नरसिंह भगताचा चेला झाला आहेस पण त्यांचा मोठे-पणा मला समजलाय तेवढाहि तुला नाहीं समजला ?

**साधुराम :** तुम्ही नरसी भगतांचा काय मोठे-पणा गातां हा ? तुम्ही तर त्यांना चमत्कारी पुरुष ठरवून आमचा कांटा काढून टाकायची युक्ति योजली आहेसें दिसतें.

**मतिराम :** तुझ्या भगताला गांवांतले लोक नि त्यांतहि आपली कट्टर नागरजात गांवाबाहेर हांकल-णार नाहींत असें मी केलें—आणि शिवाय त्याला परमेश्वररूप म्हटलं तर उलट तूं असा श्राप देतो आहेस ?

**साधुराम :** परमेश्वररूप ! अशा रीतीनें संतांना परमेश्वर ठरवून शिखरावर चढवण्याची रीत फार छान आहे आपली ! (वेडावण्याच्या सुरांत) "पाहा, बाबांनों, नरसीभगत आहेत परमेश्वररूप. त्यांचे चमत्कार तर पाहा. त्यांच्यासारखे तुम्ही समर्थ असाल तर त्यांच्या आचरणाचें अनुकरण करा, नाहीं तर नाहीं " ( गंभीरपणें ) म्हणजे असें कीं नरसी मेहता झाले काय अन् न झाले काय ? समाजाला कांहींच फायदा नाहीं.

**मतिराम :** तुला हें सगळं कसं समजणार ? पोर आहेस पोर !

**साधुराम :** मी आज कितीतरी महिन्यांपासून भगतांच्या बरोबर राहिलों आहे ना ? नरसी मेहतां-मध्यें कांहींसुद्धां चमत्कार वाटण्याजोगें नाहीं. सरळ, साधा, आपल्यासारखा माणूस आहे. ( हंसत ) कदाचित् कांहीं बाबतींत आपल्याहून कमीच म्हणावा लागेल. म्हणतात कीं बिचारे आठव्या वर्षी बोला-यला शिकले. एका साधूनें म्हणायाला जड असा ' श्रीकृष्ण ' शब्द शिकवला, आणि कोण जाणे कसा, पण तो त्यांना म्हणतां येऊं लागला. बिचाऱ्या प्राण्याला सबंध आयुष्यांत ह्या शब्दावांचून अधिक कांहीं बोलतां येऊं लागलेसें दिसत नाहीं.

**नरसी :** ( बाजूच्या चौकांत जातांना ऐकूं येतें )

हलक्या कर्माचा मी नरसी, वैष्णव मजला प्यारे रे.
हरिजनांहुनी भिन्न म्हणति, त्यांनि फुकट दवडिले फेरे रे !

**मतिराम :** अंत्यज सुद्धां हरिजन ? (नावड दाखवीत)







अहं, अहं ! ( दृढपणें ) पाहतोंच. ( क्षणभर थांबून ) जातों. भवनाथाला जायला उशीर होतो आहे.

[ जातो. बाजूनें गीतचरणाचा स्पष्ट आवाज येतो. मधूनच टाळचिपळयांचा आवाज. ]

**नरसी :** हरिजनांहुनी भिन्न म्हणति त्यांनिं फुकट दवडिले फेरे रे ! [ टाळ चिपळयांची धून. ]

### दृश्य ५ वें
### स्थळ: १ ल्या दृश्याचें.

**मतिराम :** ( खडावांचा खटखट आवाज एकदम थांबतो. ) या खडावांना आज झालें आहे काय ? पवनखडावांवर उडत गेल्यासारखा तर रोज मी गिरनारच्या दरवाज्यापासून भवनाथाला डोळे उघडण्याच्या आंत पोंचत असे. ठीक, जरा ठोकून नीट करूं दे. ( दगडावर ठोकतो. )

**काळपुरुष :** ( घोगऱ्या आवाजांत ) मला काळपुरुषाला कोण ठोकतो आहे ?

**मतिराम :** ( पुनः खडावा आपटीत ) त्याच्याच लायकीचा तूं आहेस. घे आणखी.

**काळपुरुष :** माझ्या हृदयावर कोरलेले अशोकाचे लेख कालपासून कसे उल्हासानें हंसत आहेत ! नरसैंयानें हरिजनांचें आमंत्रण स्वीकारलें ही गोष्ट अनंत काळपर्यंत आठवली जाईल.

**मतिराम :** यामुळें कांहीं कोणी डगमगून जाणार नाहीं, समजलास ? तुझ्यावरचे अशोकाचे बौद्धलेख अनंतकाळपर्यंत सर्वांना आठवले तर खुशाल आठवोत. बुद्धाला आम्ही अवतार म्हणून स्वीकारून कसा हद्दपार केला आहे ? परधर्मीयांना अवमार्गाला लावण्यासाठीं, विष्णूनें बुद्धाचा अवतार घेतला असें वर्णन आम्ही पुराणांतून सुरू केलें. प्रशंसा करायला आमचा कांहीं विरोध नाहीं, अनुकरण करण्याबाबतच विरोध आहे. बुद्धाला आम्ही कोळून प्यालों. या संताची काय पाड आहे ! त्यांनाहि आम्ही पचवून टाकूं पाहाना, नरसैंयांच्या जीवनाला चमत्कार-कथांमध्यें बरोबर बसवून देऊं—त्याच्याच काव्यांच्या मदतीनें.

**काळपुरुष :** द्वारकेंत जुनागडच्या नरसैंयाची हुंडी श्यामळशाशेटनीं स्वीकारली, मुलगी कुंवरबाईचें आजोळपण भगवंतांनीं स्वतः पुरें केलें, आणि मुलगा श्यामळशा याचा विवाह पार पाडला. ह्या चमत्कारांची गोष्ट करतां का ? द्वारकेचा कोणी धनाढ्य वैष्णव नाहीं का अशी मदत करूं शकणार ? अर्थातच मेहतांना मात्र या सगळया गोष्टींत भगवंताची मदत दिसणार हें खरेंच. तें कसें का असेना, परंतु अशा चमत्कारांनींच मोठ्या माणसांचें मोठेपण मापणें हें बरोबर आहे का ?

**मतिराम :** अरे इथं मापायचें कोणाला आहे ! कापायचें आहे.

**काळपुरुष :** असं असेल तर ऐकून ठेव. तुला कधींहि तें कापतां येणार नाहीं. वाटेल तेवढ्या चमत्कार-कथांमध्यें बसवायचा हवा तेवढा प्रयास खुशाल करोत. जगाला सर्वांत मोठा चमत्कार पाहतां येणार नाहीं एवढें आंधळें जग खासच नाहीं.

**मतिराम :** कोणता ?

**काळपुरुष :** हा, सरळ बंधुभावानें हरिजनवस्तींत भजनासाठीं मेहता गेले तो. येत्या युगांचें हें प्रसादचिन्ह आहे. तुमचें कांहीं चालणार नाहीं. मला स्पष्ट दिसतं आहे भविष्याच्या भिंतीआड, — मेहतांचें हें शहाणपण कसें मोहरून जाणार आहे तें.

**मतिराम :** ( जरासें हंसल्यासारखें ) हा दगड असूनहि बोलतो आहे हा सुद्धां चमत्कारच नाहीं का ?

**काळपुरुष :** कोणास ठाऊक, — दगड बोलतोय कीं तुझा अंतरात्मा ?

**मतिराम :** ( वेदनेनें ) अरेरे ! साधुसमाच्या डोळयांत नरसैंयांची मूर्ति किती नम्रशी कोरलेली होती ? आणि केवढी भयसूचना भगत देत होता ?

**नरसी :** ( पडद्या आडून आवाज )

हलक्या कर्मांचा मी नरसी, मजला वैष्णव प्यारे रे,<br>
हरिजनांहुनी भिन्न म्हणति, त्यांनि फुकट दवडिले फेरेरे!

[ टाळचिपळयांचा आवाज मंद ... मंद ... होत जातो व पडदा पडतो. ]

———










श्री. स. मा. गर्गे

# हंगेरीला काय हवें?

## मार्क्सवादाच्या फेरतपासणीची गरज

हंगेरींतील ' ऑक्टोबर क्रांतीनें ' जगांतील कम्युनिस्ट पक्ष, कम्युनिस्ट राजवट आणि कम्युनिस्ट तत्त्वज्ञान यांना प्रचंड धक्का बसला. किंबहुना ज्या मार्क्सवादी विचारसरणीचीं हीं विविध स्वरूपें आहेत त्या विचारसरणीवरच एक प्रकारें मोठा आघात झाला आहे. त्यामुळें मार्क्सवादासंबंधीं जे अनेक समज आणि अपसमज गेल्या शंभर वर्षांत निर्माण झाले त्यांची समूळ फेरतपासणी करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. मार्क्सनें सांगितलेलें तत्त्वज्ञान म्हणजे सामाजिक विकासांतील शेवटचा शब्द असें मानणाऱ्या शब्दप्रामाण्यवाद्यांना तर हंगेरी आणि पूर्व युरोपांतील इतर देशांच्या घटनांमुळें आपल्या आजवरच्या वर्तनाचा पुनर्विचार करावा लागेल. तसें करण्याचें त्यांनीं टाळलें तर त्यांत त्यांचा तर नाश आहेच पण इतरांच्या प्रगतीच्या मार्गांतील धोंड म्हणून त्यांचा उपद्रव पोचण्याचाहि संभव आहे. मार्क्सवादाविषयीं संपूर्ण निष्ठा नसलेला पण त्याकडे प्रगतीसाठीं आशाळभूताप्रमाणें पाहणारा आणखी एक वर्ग आहे. त्यालाहि पूर्व-युरोपांतील अलीकडच्या घडामोडींमुळें मार्क्सवादाविषयींच्या अपेक्षा सोडून देण्याची आवश्यकता पटूं लागेल. या ' सहप्रवाशां'च्या मनांतील मार्क्सवादासंबंधीचा आशादीप काळवंडल्याशिवाय राहणार नाहीं.

## रशियन राजवटीचें दर्शन

मार्क्सवादाप्रमाणेंच रशियन राजवटीसंबंधीं अनेकांच्या मनांत ज्या खऱ्या आणि कल्पित इच्छा होत्या त्यांचीहि हंगेरींतील घटनांमुळें निराशा झालेली असावी. पोलादी पडद्यांतून बाहेर पडण्याची धडपड पोलंड आणि हंगेरीसारखे छोटे देश करूं लागले ही गोष्टच मुळीं रशियाच्या सदोष धोरणाचा भरपूर पुरावा आहे. कम्युनिस्ट राज्याच्या अभेद्य तटबंदीमध्यें सर्वत्र आबादीआबाद आहे, हा समज चुकीचा ठरला. रशिया आणि त्याच्या शेजारचीं इतर कम्युनिस्ट राष्ट्रें मित्रत्वाच्या नात्यानें सहजीवन कंठीत आहेत ही कल्पनाहि खोटी ठरली. तसेंच या सर्व राष्ट्रांचे संबंध समतेच्या भूमिकेवर आधारलेले आहेत हाहि समज चुकीचा ठरला. कम्युनिस्ट राजवटीमुळें या सर्व देशांतील श्रमजीवी वर्गाचे हितसंबंध एकच आहेत हें मानायाला जागा उरली नाहीं. प्रत्येक क्षेत्रांत रशियाचें वर्चस्व आणि श्रेष्ठत्व मान्य केलें पाहिजे ही वस्तुस्थिति स्पष्ट झाली. छोटया कम्युनिस्ट राष्ट्रांचें अस्तित्वच मुळी रशियाचें सार्वभौमत्व मानण्यावर अवलंबून राहिलें. आणि या सर्वांपेक्षांहि विघातक गोष्ट म्हणजे ज्या स्थानिक कम्युनिस्ट पुढाऱ्यांनीं रशियाचें श्रेष्ठत्व नाकारलें त्यांची राजकारणांतून आणि जीवनांतूनहि हकालपट्टी झाली. छोट्या कम्युनिस्ट राष्ट्रांच्या परावलंबित्वाचा हा अनुभव अनेक वर्षें येत असला तरी पहिल्या महायुद्धानंतर, म्हणजे गेल्या दहाबारा वर्षांत अधिक कठोरपणें आलेला आहे. हंगेरींतील घटनांचा बोध होण्यासाठीं गेल्या दहाबारा वर्षांतील पूर्व युरोपचें संपूर्ण समाजजीवनच तपासून पाहण्याची आवश्यकता आहे. पण त्या सर्वांचा परामर्श घेणें या ठिकाणीं शक्य नाहीं. अगदीं अलीकडच्या म्हणजे स्टालीनच्या निधनानंतरच्या कांहीं ठळक घडामोडी वरवर पाहिल्या तरी पूर्वयुरोपच्या सध्याच्या अशांततेचें कारण सांपडूं शकेल. पोलंड, हंगेरी, चेकोस्लोव्हाकिया,








पूर्वजर्मनी इत्यादी देशांतील जनतेनें जे उठाव केले त्यांची पार्श्वभूमीहि समजण्यासाठीं रशियाच्या राजकारणाचीं सूत्रें कशीं हालत होतीं हेंहि पाहावें लागेल.

## रशियन वर्चस्वापासून मुक्तता

हंगेरींतील जनतेनें २३ ऑक्टोबर रोजीं प्रचंड निदर्शनें करून ज्या मागण्या केल्या त्यांत रशियाच्या सत्तावर्चस्वाखालून बाहेर पडण्याची मागणी प्रमुख होती. हीच गोष्ट पोलंडमध्यें गेल्या मे-जूनमध्यें घडली. या मागणीला फार मोठा अर्थ आहे. रशियाच्या सत्तेला सुरुंग लावणारी ही प्रक्रिया वस्तुतः १९४८ पासूनच सुरू झाली आहे. त्या वर्षी युगोस्लाव्हियानें रशियन सत्तेचें जोखड झुगारून देण्याचें निशाण प्रथम उभारलें. इतकेंच नव्हे तर, स्टालीनच्या जिवंतपणीं युगोस्लाव्हिया आपल्या स्वातंत्र्याच्या मागणींत यशस्वी झाला. त्यावेळीं टिटो आणि त्याचे सहकारी यांना पाश्चात्य साम्राज्यवाद्यांचें हस्तक ठरविण्यांत आलें होतें. टिटोनें आपल्या देशाला स्वातंत्र्य मागून जागतिक क्रांतीचा घात केला, असेंहि म्हटलें गेलें. अर्थात् हे आरोप करून रशियन नेत्यांना फार झालें तर तात्पुरतें आत्मसमाधान लाभलें असेल. पण तशाच धर्तीच्या मागण्या इतर कम्युनिस्ट देशांतून होऊं लागल्यावर मात्र त्यांचें तें आत्मसमाधान पार नष्ट झाल्याशिवाय राहिलें नाहीं. किंबहुना कम्युनिस्ट राष्ट्रांची स्वातंत्र्याची मागणी म्हणजे रशियन नेत्यांच्या चिंतेचाच एक विषय होऊन बसला. अशा सचिंत, निराश आणि कांहींशा अपयशी विचारांतूनच त्यांना हंगेरी, पोलंड इत्यादि देशांतील स्वातंत्र्यप्राप्तीचे प्रयत्न मोडून काढण्यासाठीं लष्करी मदतीचा आश्रय घेण्याची पाळी आली आहे.

## स्टालीनच्या मृत्यूनंतर

स्टालीनचा मृत्यू ५ मार्च १९५३ रोजीं झाला. आणि त्यानंतर जेमतेम सहा आठवडेहि संपले नाहींत तोंच पूर्व-जर्मनींतील कामगारांनीं रशियाविरोधी निदर्शनें केलीं. रशियाचें वर्चस्व नको आणि रशियाच्या कलानें चालणाऱ्या कम्युनिस्ट पक्षाची राजवट नको अशा त्यांच्या मागण्या होत्या. पूर्वजर्मनींतील जनतेनें हा जो स्फोट केला त्याचे पडसाद इतर कम्युनिस्ट राष्ट्रांत उमटल्याशिवाय राहिले नाहींत. जून १९५३ मध्यें बर्लिन शहरांत रशियाविरोधी दंगे घडून आले आणि त्याच महिन्यांत हंगेरींतील पॉलिट ब्यूरोंतहि महत्त्वाची उलथापालथ झाली. रशियन नेत्यांच्या अत्यंत विश्वासांतील समजला गेलेला कारस्थानी पुढारी राकोसी, पक्षाच्या सरचिटणीस पदावरून हांकून लावण्याचें धैर्य हंगेरियन कम्युनिस्ट पक्षानें दाखविलें. त्यामागें त्यांच्या मनांतील रशियन वर्चस्व झुगारून देण्याच्या भावना नव्हत्या असें म्हणतां येणार नाहीं. कारण त्याच्याच पुढच्या महिन्यांत हंगेरींत जें नवें मंत्रिमंडळ स्थापन झालें त्याचें नेतृत्व राकोसीचा प्रतिस्पर्धी इम्रेनागी यांच्याकडे गेलें. वरील घटनांचीं पाळेंमुळें प्रत्यक्ष रशियांतहि शिरलेलीं असावींत. कारण हंगेरींत नागी मंत्रिमंडळ स्थापन झाल त्याच महिन्यांत रशियाचा अंतर्गत कारभारमंत्री बेरिया बडतर्फ झाला व पुढें डिसेंबर १९५३ मध्यें त्याला फासावर जावें लागलें. १९५४ हें वर्ष पूर्वयुरोपांतील कम्युनिस्ट राज्यांच्या दृष्टीनें हानीकारक ठरलें. अल्बानिया, चेकोस्लोव्हाकिया, पोलंड, रुमानिया आणि हंगेरी या पांचहि देशांत पहिल्या तिमाहीतच अनेक कम्युनिस्ट कार्यकर्त्यांवर राज्यद्रोहाचे खटले भरले. रशियन पद्धतीप्रमाणें गुप्त चौकशी आणि आरोपींचे जाहीर कबुलीजबाब इत्यादिसारखे सोपस्कार झाल्यानंतर त्यांना क्रूर शिक्षाहि झाल्या. अशा सर्व घटनांची आणखी एक आवृत्ति १९५५ च्या एप्रिल, मे, जून या तीन महिन्यांत घडून आली. त्यावेळींहि










चेकोस्लोव्हाकिया, पूर्वजर्मनी आणि पोलंड या देशांतील कांही प्रमुख कम्युनिस्टांना प्रतिक्रांतिकारक ठरविण्यांत आलें. पाश्चात्य साम्राज्यवाद्यांशीं हातमिळवणी केल्याचे त्यांच्यावर आरोप करण्यांत आले आणि शेवटीं त्यांच्याच कुटुंबियांकडून त्यांचा धिक्कार करावयास लावून त्यांना कायमचे निकालांत काढले.

स्टालीनच्या मृत्यूनंतर दोन वर्षांतच कम्युनिस्ट राष्ट्रांत स्वातंत्र्याची मागणी करण्याइतक्या जोराच्या हालचाली होऊं लागल्या. या हालचालींचीं सूत्रें हातीं असलेल्या कम्युनिस्ट पुढाऱ्यांना जगांतून नाहींसें करूनहि योग्य तो पायबंद बसत नाहीं असें अनुभवाला आल्यानंतर रशियन सत्ताधाऱ्यांनीं अधिक कडक उपाय योजावयाचें ठरविलें. त्याचें दृश्य-चिन्ह म्हणजे १४ मे १९५५ रोजीं झालेला वॉरसा करार. या कराराप्रमाणें रशिया आणि पूर्वयुरोपांतील सात कम्युनिस्ट राष्ट्रें यांनीं परस्परांना संकटांच्या वेळीं लष्करी मदत देण्याचें मान्य केलें. कराराच्या कलमाप्रमाणें ही संयुक्त लष्करी आघाडी असली तरी खरें सामर्थ्य आणि सूत्रें रशियाच्याच हातांत आहेत हें सहज लक्षांत येतें. या लष्करी आघाडीचा प्रमुख सेनापति मार्शल कोनीव्ह रशियन असून त्याची मुख्य कचेरी मास्को येथेंच आहे. या करारानंतरच्या काळांतहि अल्बानियांतील दोन मंत्री बडतर्फ झाले. पोलंडचा प्रमुख कम्युनिस्ट बर्मन यानें मंत्रिपदाचा राजिनामा दिला. पोझनान येथें भयंकर स्वरूपाच्या कामगार-दंगली झाल्या. हंगेरीचा माजी संरक्षण मंत्री फार्कस पक्षांतून हाकलला गेला. हंगेरीयन पुढारी 'राकोसी' पक्षाच्या कार्यांतून निवृत्त झाला. या सर्व घटना वैयक्तिक स्वरूपाच्या दिसत असल्या तरी त्यामागें रशियाच्या नेत्यांची सत्ता टिकवून ठेवण्यासाठीं चाललेली धडपड स्पष्ट आहे. नको असलेले पुढारी काढून टाकणें, लोकांच्या स्वातंत्र्य-भावना व्यक्त करणारे गट हांकून लावणें आणि रशियाला जास्तीत ज्यास्त अनुकूल व एकनिष्ठ राहाणारे गट हाताशीं धरणें, या घडामोडी म्हणजे रशियाच्या सत्तावर्चस्वाचा एक आवश्यक भाग होऊन बसला आहे.

### आणखी कांहीं घटना

वरील सर्व घटनांची कांहींशीं विस्तारानें नोंद करण्याचें कारण एवढेंच कीं त्यामुळें हंगेरींतील अलीकडच्या घडामोडींवर चांगला प्रकाश पडूं शकेल. वरील घडामोडींच्या संदर्भातच हंगेरीच्या स्वातंत्र्य-प्रयत्नांचें खरें स्वरूप दिसूं शकेल. याच दृष्टीनें पुढील आणखी तीन घटनांची नोंद घेणेंहि जरूर आहे. ( १ ) ज्या टिटोच्या विचारसरणीचा धिक्कार करण्यासाठीं चेकोस्लोव्हाकिया, रुमानिया आणि पोलंड या देशांतील अनेक कम्युनिस्ट कार्यकर्त्यांना फांसावर जावें लागलें, त्यांच टिटोची मैत्री करण्यासाठीं रशियन नेत्यांचे प्रयत्न सुरू झाले. वरील सर्व देशांतील जे पुढारी टिटोवादाच्या आरोपावरून शिक्षेस पात्र ठरले त्यांनीं आपल्या देशाची आणि कम्युनिस्ट पक्षाची वर्षानुवर्षें सेवा केली होती. त्यांचा रशियाशीहि अनेक वर्षांचा जुना संबंध होता. अशा स्थितींतहि त्यांना टिटोसारखी आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळविण्याची इच्छा व्हावी आणि त्यासाठीं प्राणार्पण करण्यास त्यांनीं तयार व्हावें या घटना लक्षांत घेण्यासारख्या आहेत. अशा कम्युनिझमशीं एकनिष्ठ असलेल्या पण आपल्या राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवूं इच्छिणाऱ्या पुढाऱ्यांना नष्ट करून शेवटीं रशियानें तरी काय मिळविलें ? ज्या टिटोवादाचा त्यांनीं धिक्कार केला त्याच्याशींच अनुनय करण्याचा त्यांच्यावर प्रसंग आला. त्यांतूनच २६ मे १९५५ रोजीं बेलग्रेड येथें रशिया-युगोस्लाव्हिया यांचीं बोलणीं सुरू झालीं. त्यानंतर काढलेल्या एका संयुक्त पत्रकावरूनहि टिटोचाच विजय झाल्याचें दिसून येतें. पत्रकाचा आशय असा कीं, " प्रत्येक देशांत समाजवादाचा विकास, तेथील सामाजिक












परिस्थिति आणि स्थानिक वैशिष्ट्यें लक्षांत घेऊनच केला जाईल. समाजवाद कोणत्या पद्धतीनें विकसित व्हावा या संबंधीचें धोरण ठरविणें त्या त्या देशाचा खास अधिकार आहे." या निवेदनांत टिटोनें आपल्या देशांतील समाजवादाचें वैशिष्ट्य तर रशियाकडून मान्य करून घेतलेंच, शिवाय तसाच अधिकार इतर देशांनाहि असावा असेंहि कबूल करून घेतलें आहे. अर्थात् रशियाच्या दृष्टीनें ही कबुली युगोस्लाव्हियापुरतीच मर्यादित राहिली. पोलंड आणि हंगेरी या देशांतील जनतेनें आपल्या देशाचें निराळें समाजवादी वैशिष्ट्य असावें, अशी मागणी करतांच रशियानें ती मोडून काढण्याचा प्रयत्न केला. टिटोपुढें शरणागती आणि पोलंड-हंगेरीसारख्या छोट्या राष्ट्रांवर दडपशाही, ही रशियन धोरणांतील विसंगति पाहण्यासारखी आहे.

( २ ) वरील विधानालाच पोषक ठरणारी आणखी एक घटना उल्लेखितां येईल. पोलंडमध्यें जून १९५६ मध्यें रशियाच्या वर्चस्वाखालून मुक्त होण्याचे प्रयत्न सुरू झाले. २८ जूनला पोझनान येथें कामगारांनी आपल्या स्वातंत्र्यभावना व्यक्त केल्या. त्यांतून दंगली उद्‌भवल्या. आणि रक्तपाताचे प्रसंगहि घडून आले. रशियाच्या श्रेष्ठत्वाला धक्का देणाऱ्या या घटना पाहातांच रशियाचे पंतप्रधान बुल्गानीन यांनीं वॉरसाला भेट दिली. त्यावेळीं त्यांनीं जें जाहीर निवेदन प्रसिद्ध केलें त्याचा आशय लक्षांत घेण्यासारखा आहे. त्यांत म्हटलें होतें, ' राष्ट्र–वैशिष्ट्याच्या नांवाखालीं समाजवादी आघाडीचीं आंतरराष्ट्रीय बंधनें शिथील करण्याचे कोणी प्रयत्न करील तर तें केव्हांहि सहन केलें जाणार नाहीं. तसेंच, लोकशाहीचें क्षेत्र व्यापक करण्याच्या मिषानें कोणी सध्याच्या राज्यकारभाराला दुर्बल करण्याचा घाट घालील तर तेंहि आम्हाला सहन करतां येणार नाहीं. '

( ३ ) हंगेरींतील घटना घडण्यापूर्वी सुमारें एक आठवडा मास्कोहून कम्युनिस्ट देशाला कांहीं गुप्त आदेश पाठविण्यांत आले. त्यांत रशियांतील कम्युनिस्ट पक्ष इतर देशांतील कम्युनिस्ट पक्षांचा मार्गदर्शक आहे असें म्हटलें होतें. तसेंच कोणत्याहि देशांतील कम्युनिस्ट पक्षाची योग्यता आणि पात्रता हें ठरविण्याचें एकमेव साधन म्हणजे, ते पक्ष रशियांतील कम्युनिस्ट पक्षांशी किती प्रमाणांत एकनिष्ठ आहेत हेंच मानलेलें आहे.' रशियानें ठरविलेली ही कसोटी काय दर्शविते तें निराळं सांगण्याची आवश्यकता नाहीं. रशियाचें सत्तावर्चस्व आणि इतर देशांचा दुय्यम दर्जा त्यांतून स्पष्ट होतो. सर्व कम्युनिस्ट राष्ट्रें एकाच समान पातळीवर आहेत, असा जो दावा केला जातो त्याचा मागमूसहि वर उल्लेखिलेल्या तिन्ही घटनेंत सांपडत नाहीं.

## ऐतिहासिक पार्श्वभूमि

वरील सर्व घटनांच्या आणि निवेदनाच्या पार्श्वभूमीवर हंगेरीच्या असंतोषामागील कारणांचा शोध घेतां येईल. हंगेरीच्या जुन्या इतिहासाची तपासणी करण्याचें हें ठिकाण नाहीं. अनेक शतकांच्या पारतंत्र्यानंतर पहिल्या महायुद्धानंतर १९१८ सालीं हंगेरी स्वतंत्र झाला. ऑस्ट्रियन साम्राज्याच्या पंजांत अडकल्यामुळें त्याची प्रगती व्हावी तेवढी झाली नाहीं. स्वतंत्र झाल्यानंतर कांहीं दिवस अराजकाचा काळ गेला. त्यांतूनच कम्युनिस्ट पक्षानें सत्ता मिळविली. पण ती टिकूं शकली नाहीं. १९१९ मध्यें हंगेरींतील उजव्या गटाचा पुढारी हॉर्थी अधिकारावर आला आणि त्यानें तब्बल २४ वर्षें हंगेरीचीं सूत्रें आपल्या हातीं बळकावून ठेवलीं. त्या काळांत हंगेरींत कम्युनिस्ट पक्ष जवळजवळ नामशेष झाला होता व हॉर्थीच्या हुकूमशाहीचें हंगेरीयन जनतेवर वर्चस्व प्रस्थापित करण्यांत आलें होतें. पण दुसऱ्या महायुद्धाच्या शेवटीं म्हणजे १९४४ मध्यें रशियन लष्करानें हंगेरींत प्रवेश केला. हॉर्थी आणि त्याचे साथीदार यांना सत्ता सोडून पलायन करावें लागलें.










कम्युनिस्ट पक्षांच्या कार्याला आणि धोरणाला पुन्हा जोरानें चालना मिळाली. १९४५ ते १९४८ पर्यंतचा काळ हंगेरीयन जनतेच्या दृष्टीनें चांगला गेला. त्यावेळच्या हंगेरीयन सरकारनें कांहीं उपयुक्त सुधारणा केल्या. त्यांत शेतीसुधारणांचा विशेष उल्लेख करावा लागेल. मोठ्या जमीनदारांच्या जमिनी शेतकऱ्यांना दिल्या गेल्या. कांहीं मूलभूत उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयीकरण झालं. साक्षरता प्रसाराची मोहीम व शिक्षणाची वाढ होऊं लागली. आधुनिक यंत्रसामग्री आणि लोकांचा स्वातंत्र्य-उत्साह यामुळें हंगेरीला प्रगतीचे दिवस दिसणार अशी अपेक्षा वाटूं लागली. पण १९४८ सालीं हें सर्व गाडें बदललें. तें वर्ष म्हणजे हंगेरीच्या राजकीय जीवनाला एक मोठी कलाटणी देणारें ठरलें. हंगेरींत ज्या सुधारणा घडवून आणल्या जात होत्या त्यांची सूत्रें हळूहळू रशियाच्या हातांत जाऊं लागलीं. राकोसीनें संपूर्ण सत्ता हातीं घेण्यासाठीं रक्तपाती क्रांतीचे सर्व मार्ग हाताळावयास सुरुवात केली. राकोसी म्हणजे रशियन नेत्यांच्या इशाऱ्यानें चालणारा त्यांचा एकनिष्ठ अनुयायी. त्याच वर्षी टिटोनें रशियाविरुद्ध बंड उभारलें होतें. त्याचे पडसाद हंगेरींतहि पडूं लागले. राकोसीनें ती संधी साधून टिटोवादाच्या आरोपावरून आपल्या विरोधकांचा नायनाट केला. रशियन नेत्यांना असाच पुढारी हवा होता. राकोसीनें सत्ता हस्तगत करण्यासाठीं किती अमानुष मार्ग स्वीकारले होते, हें त्यानेंच प्रसिद्ध केलेल्या आपल्या अनुभवावरून दिसून येतें. साधनांचा अविवेक मार्क्सवादांत बसत असल्यामुळें राकोसीला आपला मार्ग चुकीचा असल्याचें कधीच वाटलें नाहीं. त्यानें अनेक बेकायदेशीर गोष्टी, अत्याचार आणि सार्वजनिक नीतिमत्तेला काळिमा फासणाऱ्या गोष्टी केल्या. केवळ राजकारणांतच नव्हे तर कला, साहित्य, शास्त्रीय संशोधनांतहि त्यानें असाच धुडगूस घातला. सर्व सामाजिक क्षेत्रांत गुप्त पोलिसांची ( A. V. H. ) भयंकर दहशत बसवली. एवढें करूनहि त्यानें हंगेरीयन जनतेला आर्थिक दृष्ट्या सुखी केलें असतें तर कदाचित् त्याचे अत्याचार सुसह्य ठरले असते. पण त्यांतहि त्यानें तंतोतंत रशियाचें अनुकरण सुरू केलें. जबरदस्तीनें सामुदायीक शेतीचे केलेले प्रयोग आणि राष्ट्राच्या आर्थिक परिस्थितीला न झेपणाऱ्या उद्योगधंद्यांची ( Heavy Industries ) स्थापना या दोन गोष्टींचा येथें प्रामुख्यानें उल्लेख करावा लागेल.

हंगेरीयन कम्युनिस्ट पुढारी रजकचा खटला म्हणजे राकोसीच्या अत्याचारी धोरणाचा कळसच म्हटला पाहिजे. रजक आणि त्याच्या बरोबरीच्या इतर ९३ सहकार्यांकडून अपराधाची जाहीर कबूली घेण्यासाठीं अतिशय विलक्षण तंत्रें उपयोगांत आणलीं गेलीं. शेवटीं त्या सर्वांना टिटोशीं संगनमत करून कट करणें आणि अमेरिकेची हेरगिरी करणें या दोन आरोपाखालीं १९५२ मध्यें फांसावर लटकविलें.

## हंगेरीचें दुहेरी दुर्दैव

हंगेरीचें दुर्दैव दोन्ही बाजूंनीं ओढवलें होतें. लोकांचें राहणीचें मान अतिशय खालावलें. त्याचबरोबर सार्वत्रिक जीवनांत दहशतीचें वातावरण उत्पन्न झालें. खुद्द कम्युनिस्ट पक्षांतच फूट पडली. अविश्वास आणि बेदिली यामुळ परिस्थिति तंग बनली. पण राकोसीच्या दुर्दैवानें तेवढ्यांतच स्टालीनचा मृत्यू घडून आला. आणि त्याबरोबर हंगेरींत आणखी एका नव्या कालखंडाला आरंभ झाला. हंगेरीच्या कम्युनिस्ट पक्षांत महत्त्वाचे बदल घडून आले. राकोसीला पक्षाच्या सरचिटणीस पदावरून दूर केलें. ३० जून १९५३ ला राकोसीचा कारभार संपला आणि चार दिवसानंतरच नागीचें नवें मंत्रिमंडळ बनलें. राकोसीच्या दहशतवादाचा कट्टर विरोधक म्हणून नागीनें लोकप्रियता मिळविली. अधिकारावर येतांच

त्यानें प्रथम हजारों राजकीय कैद्यांना मुक्त केलें. हंगेरियन जनतेंत तो अधिक लोकप्रिय बनूं लागला. गुप्त पोलिसांच्या कचाट्यांतून लोकांना सोडविण्याचें धोरण त्यानें जाहीर केलें. मागच्या कारकीर्दींत या गुप्तपोलीस संघटनेनें केलेल्या छळांचा त्यानें जाहीर धिक्कार केला. या धोरणामुळें सर्व सामान्य नागरिकांमध्यें सरकारविषयीं पुन्हां विश्वास उत्पन्न होऊं लागला. पण त्याचे हें उदार धोरण रशियन नेत्यांना उपयुक्त वाटण्यासारखें नव्हतें. अशा धोरणामुळें हंगेरियन जनतेंत कम्युनिस्ट राष्ट्रगटाच्या पकडींतून निसटून जाण्याची इच्छा बळावेल अशी भीति त्यांना वाटूं लागली. त्यांतूनच राकोसी आणि त्याचे साथीदार यांच्या कारस्थानांना हंगेरींत पुन्हा ऊत आला. त्यांनीं नागीविरूद्ध प्रचार सुरूं केला. नागी हा उजव्या गटांचा हस्तक असल्याचें ते उघड उघड बोलूं लागले. रशियाला अनुकूल असलेली राकोसीची ही भूमिका शेवटी यशस्वी झाली. नागीची अधिकारपदावरून मार्च १९५५ मध्यें हाकालपट्टी झाली. त्याचे जागी राकोसीचा एक हस्तक हेगेडियस अधिकारावर आला. राकोसीचें कारस्थान यशस्वी झाल्यामुळ हंगेरींत पुन्हां दहशतवादाची भीति उत्पन्न झाली. त्याच्याच पुढच्या महिन्यापासून म्हणजे, एप्रिल ते जूनपर्यंत चेकोस्लोव्हाकिया, पूर्वजर्मनी आणि पोलंड या तिन्हीं देशांत राज्यद्रोहाचे खटले अनेक पुढाऱ्यांवर भरण्यांत आले. तीच स्थिति हंगेरींतहि घडली. ‘ सामुदाईक शेतीच्या धोरणाला विरोध करणारा प्रतिक्रांतिकारकाचा एक गट, त्या राजकीय खटल्यांत गोंवला गेला. त्यामुळ आपोआपच रशियाच्या धोरणाला विरोध करणारा गट शिल्लक राहिला नाहीं. नागी आणि त्याचे सहकारी तुरुंगांत पडले.

नागीच्या कांहींशा उदार धोरणाचा एक चांगला परिणाम मात्र असा झाला होता कीं, लोक दहशतवादी राजवटीलाहि धिटाईनें विरोध दाखवूं लागले. प्रथम त्यांची धिटाई अगदी छोट्या क्षेत्रांत दिसली. पण हळूहळू त्यांचीं मुळें पक्कीं बनूं लागलीं. सरकारला सामुदाईक विरोध करण्याचें धैर्य दाखविण्याइतकी लोकांची तयारी होऊ लागली. त्यांतूनच २३ आक्टोबरला प्रचंड स्फोट उडाला.

### निदर्शनांचें स्वरूप

बुडापेस्टमध्यें झालेलीं निदर्शनें प्रातिनिधिक स्वरूपाचीं होतीं. त्यांत लेखक आणि विद्यार्थी, शेतकरी आणि कामकरी, कम्युनिस्ट आणि बिगर-कम्युनिस्ट या सर्वांनीं भाग घेतला होता. तो सार्वजनिक असंतोष केवळ एखाद्या छोट्या गटाकडून व्यक्त झाला नव्हता. किंवा रशियन नेते म्हणतात त्याप्रमाणें, बाहेरच्या चिथावणीमुळें मूठभर लोकांकडून प्रदर्शित झालेला नव्हता. कारण, किरकोळ एखादा गट अथवा तत्कालीन कांहीं उपऱ्या कारणामुळें उठलेले लोक सतत महिनोगणती बंदुकीच्या गोळयापुढें आणि सैनिकांच्या छळापुढें टिकाव धरूं शकत नाहींत. त्या असंतोषामागें कांहींतरी खोलवर रुजलेलीं कारणें असलीं पाहिजेत. तसेंच तो बहुसंख्य लोकांकडून उत्स्फूर्तपणें व्यक्त झाला पाहिजे. आणि या दोन्ही गोष्टी हंगेरीयन जनतेच्या उठावामागें किती प्रखरतेनें होत्या हें त्यांनीं केलेल्या मागण्यावरून स्पष्ट होतें. निदर्शकांनीं अनेक प्रकारच्या मागण्या केल्या. दैनंदिन जीवनाच्या गरजा प्राप्त करून घेण्यापासून परकीय सत्तेच्या जोखडांतून मुक्त होईपर्यंत सर्व प्रकार त्या मागण्यांत दिसून येतात. पण त्यांतून तीन मागण्यांवर निदर्शकांचा सर्वांत अधिक भर होता. हंगेरीयन जनतेला नेमकें काय हवें आहे याची स्पष्ट कल्पना त्या मागण्यांवरून होते. त्या अशा — ( १ ) कम्युनिस्ट पक्षाची राजवट नको. ( २ ) रशियन लष्करानें तावडतोब निघून जावें. ( ३ ) राज्यकारभार लोकशाही स्वरूपाचा पाहिजे. या तिन्ही मागण्यांचें स्वरूप एका अर्थानें सारखेंच आहे. आणि ते म्हणजे हंगेरीयन जनतेला



अनुक्रमणिका







लोकसत्ताक सार्वभौमत्व पाहिजे. या मागण्यांचा दुसरा अर्थ असा की, ( १ ) सध्या हंगेरींत असलेलें सरकार कम्युनिस्ट पक्षाच्या नांवाखालीं एका लहानशा गटाच्या हातीं केंद्रित झालेलें आहे. ( २ ) तो गट रशियाच्या धोरणानें वागणारा असल्यामुळें संपूर्ण राज्य रशियन सत्तेच्या पकडी-मध्यें आहे. आणि या दोन्ही प्रकारांमुळें हंगेरींत लोकशाहीची खच्ची झालेली आहे. वारसा कराराच्या निमित्तानें हंगेरींत ठेवलेल्या लष्करांचें समर्थन करणें रशियाला शक्य असलें तरी, सर्वसामान्य हंगेरीयन नागरीक तो करार मान्य करावयास तयार नाहीं.

## जनतेचा तीव्र असंतोष

जनतेची इच्छा बुडापेस्टमध्यें झालेल्या निदर्शनांच्या द्वारें व्यक्त झाल्याबरोबर अधिकारारूढ कम्युनिस्ट पक्षानें नागीच्या हातीं राज्यकारभाराचीं सूत्रें सोपविण्याची तयारी दाखविली, पण त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. खवळलेल्या समुदायानें गुप्त पोलीस आणि सैनिक यांचा प्रतिकार सुरूं केला. अनेक ठिकाणीं चकमकी उडाल्या. रशियन सैन्यानें शहरांत रणगाडे फिरवून दहशतीचें वातावरण उत्पन्न केलें. लोक आणि सैनिक यांच्या झडपी रस्तोरस्तीं होऊं लागल्या. भयंकर स्वरूपाचा रक्तपात घडला. जगभर त्या अत्याचाराचे पडसाद उठले. नागीच्या हातीं सत्ता दिल्यावर कदाचित् लोक शांत होतील अशी अपेक्षा होती. पण तेवढ्यानें लोकांचें समाधान झालें नाहीं. खुद्द नागीची एक प्रकारें गळचेपी होऊं लागली. लोकांचा असंतोष आणि रशियाचा रोष यांच्या कात्रींत तो सांपडला. रशियन सैन्य हंगेरीबाहेर गेल्याशिवाय लोकांचें समाधान होणार नाहीं, याची त्याला स्पष्ट कल्पना आली. त्यानें यूनोकडे धांव घेतली. आणि रशियन सैन्य हंगेरीबाहेर ताबडतोब काढण्याचा यूनोनें रशियाला आदेश द्यावा, अशी उघड उघड मागणी केली. त्याबरोबर नागी सरकारचें अस्तित्व संपलें. खुद्द नागीचें अस्तित्व संपलें कीं नाहीं, हें अद्याप जाहीर व्हावयाचें आहे. लोकांच्या उठावाला प्रति-क्रांतिकारक ठरवून रशियानें जानोस कादर याच्या नेतृत्वाखालीं नवें मंत्रिमंडळ स्थापन केलें. नागी पक्षाबद्दल सहानुभूति दाखविणाऱ्या लोकांचा अधिक जोरानें छळ सुरू झाला, तो अद्याप कायमच आहे. क्रांति-प्रतिक्रांतीचा शब्दच्छल करून रशिया आणि जानोस कादर सत्ता टिकविण्याची धडपड करीतच आहेत. त्यापुढचा सर्व इतिहास आणि त्यांतील सर्व लहानमोठ्या घटना अगदीं ताज्या आहेत. त्यांचा इत्यर्थ एवढाच कीं, रशिया ज्यांना हंगेरीची सत्तासूत्रें बहाल करतो ते क्रांतिकारक ठरतात. आणि जे रशियाचें सत्तावचस्व झुगारून देऊं इच्छितात, ते प्रतिक्रांतिकारक ठरतात. या प्रतिक्रांतिकारकांना पूर्वी ' टिटोवादी ' म्हटलें जात असे. आणि आतां ' पाश्चात्यांचे हस्तक ', ' फॅसिझमचे पुरस्कर्ते ', ' जमीनदारांचे बगलबच्चे ' इत्यादि विशेषणें बहाल केलीं जातात.

रशिया आणि पूर्व-युरोपांतील कम्युनिस्ट राष्ट्रें यांचे संबंध समान भूमिकेवरून बनलेले नाहींत, हें वरील सर्व घटनांवरून स्पष्ट होतें. तरीपण वादाकरितां या सर्व राष्ट्रांत समान भूमिका आहे असें आपण गृहीत धरूं या. मग प्रश्न उपस्थित होतो कीं, रशियाला आपला निराळा एक गट निर्माण करण्याची निकडीची गरज कोणती ? या छोट्या देशांत मार्क्सवादी क्रांति करून तेथें कामगार हुकूमशाही स्थापन करावी, असा एक हेतू असू शकतो. पण त्यासाठीं खुद्द रशियन नेत्यांची तरी निश्चित तात्त्विक भूमिका काय दिसते ? स्टालीनच्या काळांत 'ट्रॉट्स्कीवादी ' ही शिवी होती. तीच पुढें ' टिटोवादा 'ला लागू करण्यांत आली. आणि आतां खुद्द 'स्टालीनवाद'च त्या अर्थाचा बनला आहे. अशा स्थितींत मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचा आणि लेनिनच्या धोरणाचा अर्थ कोणी लावावयाचा ? कीं, रशियांत ज्यावेळीं

जे सत्ताधारी असतील त्यांनीं लावलेला अर्थ खरा मानावयाचा ? क्रांति आणि प्रतिक्रांति यांची कसोटी कोणी ठरवावयाची ?

## रशियन साम्राज्यशाही !

रशियाच्या धोरणामागें साम्राज्यवादी हेतू आहे कीं नाहीं, हा कदाचित् वादाचा प्रश्न ठरूं शकेल. पण त्या हेतूमागें आर्थिक आणि राजकीय वर्चस्वाची अनेक उद्दिष्टें आहेत, ही गोष्ट नाकारता येणार नाहीं. पूर्व-युरोप मुख्यतः शेतीप्रधान प्रदेश आहे. त्याची लोकसंख्या दहा कोटीच्या जवळपास आहे. रशियाच्या मदतीनें अलिकडे त्या प्रदेशांत अनेक कारखानेहि उभारले गेले आहेत. त्या कारखान्यांची मालकी त्या त्या देशाच्या सरकारकडे आहे. (आणि तीं सरकारें रशियाच्या धोरणानें चालणारीं आहेत.) या सर्व देशांचा व्यापार मुख्यतः रशियाशींच होतो. या देशांत खनिज द्रव्यांचीहि विपुलता आहे. पोलंडचा कोळसा, हंगेरीचें बॉक्साईट, रुमानियाचें तेल आणि पूर्वजर्मनीचें युरेनियम यांचे उत्पादन पुष्कळ प्रमाणांत होतें. आणि हीं सर्व द्रव्यें लष्करी साधनसामग्रीसाठीं अतीशय उपयुक्त ठरणारीं आहेत. या सर्वांचा अर्थ असा कीं, मनुष्यबळ, शेतीचें उत्पादन आणि खनिज द्रव्यें हा सर्व दारूगोळा स्वरक्षणविषयक तयारीसाठीं उपयुक्त पडणारा आहे. शिवाय, या सर्व देशांची जी एक साखळी तयार झाली आहे तिचा उपयोग तटबंदी-सारखा होऊं शकतो. या सर्व देशांतील प्रमुख विमानतळ रशियाच्या ताब्यांत आहेत. आणि या सर्व देशांच्या संरक्षणाची जबाबदारी वारसा-कराराप्रमाणें रशियाकडेच आलेली आहे.

## वैचारिक शोषण

पूर्व युरोपांतील आर्थिक धोरण, राजकीय सत्ता आणि लष्करी केंद्रें यांचीं सूत्रें रशियाच्या हातीं आहेत, ही गोष्ट नाकारतां येण्यासारखी नाहीं. पण या सर्वांपेक्षां रशियाजवळ सर्वांत भयंकर जें हत्यार आहे त्याला पोलंड आणि हंगेरीच्या उठावाच्या स्वरूपांत प्रतिकार करण्याचा प्रयत्न होत आहे. हें हत्यार म्हणजे वैचारिक शोषणाचें. हंगेरींतील जन-तेनें लोकशाहीची मागणी करून या वैचारिक शोषणाला विरोध दर्शविला आहे.

वैचारिक शोषणाची कल्पना केवळ रशियन डोक्यांतून निघालेली नाहीं. तशीच, ती केवळ रशियाच्या परराष्ट्र धोरणामुळेंहि निर्माण झालेली नाहीं. तिचा उगम खुद्द मार्क्सवादांतच शोधावा लागेल. एकदां मार्क्सवाद स्वीकारला कीं त्यांतून अपरिहार्य-पणें वर्गीय द्वंद्व, एकपक्षीय सरकार, कामगार-हुकूमशाही इत्यादि सर्व प्रकार अपरिहार्य मानावे लागतात. आणि यांपैकीं कोणच्याहि गोष्टीला विरोध करणें महाभयंकर पाप ठरतें. वर्गीय द्वंद्व न मान-णारी व्यक्ति भांडवलदारांची हस्तक ठरतें, एकपक्षीय कारभाराला अनेक पक्षीय कारभाराचा पर्याय सुच-विणारा फूटपाड्या मानला जातो, आणि कामगार हुकुमशाहीला विरोध दर्शविणारा अखिल श्रमजीवी वर्गाचा शत्रू ठरविला जातो. ही असहिष्णुता आणि अनुदारता हे मार्क्सवादाचे अंगभूत दोष आहेत. यांतून मुक्त होण्यासाठींच पूर्व युरोपांतील जनता धडपड करीत आहे. पोलंडमधील उठाव काय किंवा हंगेरींतील स्वातंत्र्यलढा काय, या सर्वांचा हाच अर्थ आहे.

---










प्रा. अ. भि. शहा

# धर्म व स्वातंत्र्य-एक चर्चा

## एक प्रक्रिया

विसाव्या शतकाच्या प्रारंभीं कांहीं विचारवंतांचा विज्ञानावरील विश्वास डळमळूं लागला. विज्ञानामुळें माणूस नैतिक मूल्यांची जोपासना करील कीं नाहीं, याबद्दल त्यांच्या मनांत संदेह निर्माण झाला. पहिल्या महायुद्धांतील हत्याकांड, रशियामधील साम्यवादी क्रांतींत व त्यानंतर झालेले अमानुष अत्याचार, फासिझम् व नात्सीझम्खालीं झालेला नैतिक मूल्यांचा ऱ्हास, यामुळें त्यांची शंका अधिकच बळावत चालली. दुसऱ्या महायुद्धानंतर तर अनेकांनीं विज्ञानावरील विश्वास टाकून द्यायला सुरवात केली. वैज्ञानिक प्रगति मानवाला नैतिक विकासाकडे नेईलच याबद्दल त्यांना खात्री वाटेना. त्यांचें म्हणणें असें कीं विज्ञानामुळें माणसाची भौतिक भरभराट साधली जाईल, परंतु त्याचबरोबर मनुष्यजातीला सर्वनाशाचा धोका निर्माण होईल, नव्हे झालाच आहे. कारण, वैज्ञानिक शोधांमुळें मनुष्याची जशी सर्जनशक्ति अमाप झाली आहे तशीच त्याची संहारशक्तिसुद्धां कल्पनेच्या पलीकडे गेली आहे. त्याचबरोबर वैज्ञानिक विचारसरणीच्या प्रसारामुळें नीतिबंधनांची धार्मिक व आधिभौतिक बैठक जवळजवळ नाहींशीं झाली आहे. निव्वळ बुद्धिनिष्ठेंतून नीतिमूल्यें वृद्धिंगत होतीलच असें नाहीं, असें गेल्या पन्नास वर्षांचा अनुभव सांगतो. म्हणून नैतिक आचाराच्या प्रेरणेकरितां मानवानें परत धर्माकडे वळलें पाहिजे, या विचाराचे पुरस्कर्ते आज पाश्चात्य देशांत अनेक आढळतात. पौर्वात्य देशांत सुद्धां या विचारप्रवाहाचें प्रतिबिंब पडलें आहे. उदाहरणार्थ, ब्रह्मदेशांत बुद्धवादी समाजवाद स्थापन करण्याचे प्रयत्न चालू आहेत, असें सांगण्यांत येतें. खुद्द भारतांत लोकशाही समाजवादी श्रद्धेला वाहून घेतलेले लोक सुद्धां मानवी जीवनाचें अंतिम ध्येय म्हणजे दिक्कालांचीं बंधनें तोडून मोक्ष किंवा निर्वाण गांठणें हें होय असें प्रतिपादन करू लागले आहेत.

## कराची येथील सेमिनार

या प्रक्रियेचे पडसाद आजच्या जगाच्या वैचारिक जीवनांत कसे उठले आहेत ते दाखविण्याकरितां 'वर्ल्ड कॉंग्रेस फॉर कल्चरल फ्रीडम्' या संस्थेतर्फें हाम्बूर्ग व रंगून येथें भरलेल्या परिषदांमध्यें झालेल्या चर्चेचा निर्देश करतां येईल. गेल्या डिसेंबर १९५६च्या दि. २३,२४ व २६ या दिवशीं कराची येथें भरलेल्या सेमिनारपुढें सुद्धां धर्म व व्यक्तिस्वातंत्र्य यांचा संबंध, हाच विषय होता. सेमिनारमधली चर्चा बहुंशीं इस्लामच्या अनुषंगानें झाली. परंतु ज्याअर्थीं सर्व जागतिक धर्मांचें खरें शिक्षण एकच व सनातन स्वरूपाचें आहे असें समजण्यांत येतें, त्याअर्थीं कराची येथें झालेली चर्चा आपल्या देशांत सुद्धां उद्बोधक ठरेल असें वाटतें. प्रस्तुत लेखांत त्या चर्चेचा गोषवारा देण्याचा प्रयत्न केला आहे.

ही सेमिनार पाकिस्तानांतील अग्रगण्य कायदेपंडित व वकील श्री. ए. के. ब्रोही यांच्या उत्साहामुळें घडवून आणली गेली. पाकिस्तानच्या राजकारणांत सांस्कृतिक मूल्यांची मनापासून जोपासना करणारी एखादी व्यक्ति दाखवायची असेल, तर श्री. ब्रोही यांचा प्रथम निर्देश करावा लागेल. वर उल्लेख केलेल्या रंगून परिषदेला ते हजर होते. तिकडच्या अनुभवानें प्रेरित होऊन, आपल्या देशांतील वैचारिक जीवनाला लोकशाहीला पूरक अशी एक नवीन चालना मिळावी, या उद्देशानें त्यांनीं 'पाकिस्तान कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम्' या संस्थेची स्थापना केली. कराची, हैदराबाद, लाहोर, पेशावर व ढाका येथील कांहीं प्राध्यापकांचें सहकार्य मिळवून नुकतीच झालेली सेमिनार श्री. ब्रोहींनीं घडवून आणली.

## सेमिनारचे विषय

सेमिनारकरितां निवडलेल्या विषयांची चार उपविषयांमध्यें विभागणी केली होती. उपविषय व त्यावर निबंध वाचणाऱ्यांचीं नांवें खालीं दिलीं आहेत.








१ धर्म व स्वातंत्र्य : श्री. ए. के. ब्रोही

२ धर्म व सांस्कृतिक स्वातंत्र्य:

( अ ) धर्म व तत्त्वज्ञान : डॉ. महमुद अहमद, 'तत्त्वज्ञान शाखेचे प्रमुख, कराची विद्यापीठ.

( आ ) जगांतील महत्त्वाचे धर्म व स्वातंत्र्य : श्री. क्यू. एम्. अस्लाम्, मानसशास्त्राचे प्राध्यापक, कराची विद्यापीठ.

३. धर्म व राजकीय स्वातंत्र्य : दोन निबंध :

( अ ) डॉ. मझरुल हक्, अर्थशास्त्रशाखेंत 'रीडर,' ढाका विद्यापीठ.

( आ ) श्री. हसन झमान, राज्यशास्त्रशाखेंत लेक्चरर, ढाका विद्यापीठ.

४. धर्म, शिक्षण व स्वातंत्र्य : श्री. सयद अली अशरफ, इंग्रजीशाखेचे प्रमुख, कराची विद्यापीठ.

सेमिनारला कराची विद्यापीठाचे कुलगुरु, इत्यादि सुमारें पस्तीस पाकिस्तानी प्रतिनिधि उपस्थित होते. याशिवाय इंडोनेशियातून प्रा. तकदीर अलीशाबाना, लेबानॉनचे श्री. बेशारा गोरायेब व भारतातर्फे मी, असे तीन विदेशीय, निरीक्षक म्हणून, हजर होतो.

### चर्चेचें स्वरूप

सेमिनारची सुरुवात दि. २३ ला संध्याकाळी कराची विद्यापीठाच्या इमारतींत झाली. श्री. ब्रोहींनीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत लोकशाहीमध्यें लोकशाहीलाच सुरुंग लावूं पाहणाऱ्यांना कितपत स्वातंत्र्य देणें योग्य होईल, हा प्रश्न उपस्थित केला. त्यांच्या वक्तव्यानंतर प्रा. अस्लाम् यांनीं आपला निबंध वाचून दाखविला. जगांतील कुठलाहि धर्म व्यक्तिस्वातंत्र्य, समता, इत्यादि लोकशाही मूल्यांचा विरोध करीत नाहीं. इस्लाम तर नाहींच नाहीं, असें कुराण इत्यादि धर्मग्रंथांचा आधार देऊन त्यांनीं सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. दुसऱ्या दिवशीं श्री. ए. के. ब्रोही यांनीं आपला 'धर्म व स्वातंत्र्य' हा निबंध वाचून दाखविला. ब्रोहींचें म्हणणें थोडक्यांत असें : कर्तव्याची भावना ही दुसऱ्या सर्व नैतिक मूल्यांच्या मुळाशीं आहे, व नीतिशास्त्राचा अंतिम आधार धर्म हाच होऊं शकतो. ऐहिक नीतिशास्त्राची परिणति आत्यंतिक व्यक्तिवाद किंवा सर्वंकश समूहवाद, यांपैकीं एकांत झाल्याशिवाय राहणार नाहीं. पाश्चात्त्य राष्ट्रांत दिसणारा, समाजापासून दुरावलेला व स्वयंकेंद्रित मानव, आणि साम्यवादी देशांत राज्यसंस्थेच्या गाड्याखालीं चिरडून निघालेला गुलामप्राय मानव, हीं दोन दृश्यें त्यांनीं आपल्या विधानाच्या समर्थनाकरितां पुढें केलीं.

ब्रोहींना अली अशरफ, हसन झमान व महमुद अहमद या तिघांनीं आपापल्या निबंधांतून अनुमोदन दिलें. अली अशरफ म्हणाले कीं, शिक्षणाला धार्मिक कलाटणी दिल्याशिवाय, व्यक्तिस्वातंत्र्य सुरक्षित ठेवण्याकरितां अनिवार्य असणारें नैतिक वातावरण निर्माण करतां येणार नाहीं. श्री. हसन झमान हे याच्याहि पुढें जाऊन असे म्हणाले कीं याकरितां शिक्षणाचीच नव्हे, तर सबंध समाजाची बहुसंख्य जमातीच्या धर्मानुसार पुनर्रचना केली पाहिजे. येथें 'धर्म' म्हणजे संस्थास्वरूप आलेला धर्म नव्हे तर त्याचे दिक्कालातीत सिद्धांत, हें त्यांनीं मुद्दाम विशद करून सांगितलें. इस्लामबद्दल बोलतांना ते, व त्यांच्या अगोदर प्रा. अस्लाम् व इतर वक्ते, म्हणाले कीं मुसलमान हे पहिल्या प्रतीचे नागरिक व मुसलमानेतर हे दुसऱ्या प्रतीचे नागरिक, ही कल्पना इस्लामला धरून नाहीं. मुसलमानेतरांना जेथें समान वागणूक मिळत नसेल तेथें दोष इस्लामच्या शिकवणुकीचा नसून, इस्लामच्या नांवानें स्वतःचें हित साधायला निघालेल्या लोकांचा आहे. ब्रोही, अशरफ, झमान व अस्लाम् यांच्या दृष्टिकोनाला तात्त्विक बैठक देण्याचें काम डॉ. अहमदनीं केलें. तत्त्वज्ञानाशिवाय स्वातंत्र्य, न्याय, 'नीति, इत्यादि कल्पनांचा अर्थ स्पष्ट होऊं शकत नाहीं, व अध्यात्मशास्त्राशिवाय तत्त्वज्ञान शक्य नाहीं; म्हणून व्यक्तिस्वातंत्र्याच्या प्रश्नाचा विचार करतांना अगोदर आपली तात्त्विक भूमिका काय आहे ती समजावून घेतली पाहिजे. विद्यापीठीय तत्त्वज्ञानाची आध्यात्मिक बैठक ज्ञानमीमांसेच्या दृष्टीनें कशी सदोष आहे, हें दाखवून डॉ. अहमद म्हणाले कीं धर्माची प्रचीति हीच अध्यात्मशास्त्राची एकमेव अनुभवजन्य बैठक होऊ शकते. म्हणून शाश्वत नीतिशास्त्राची उभारणी धर्माच्या पायावरच करतां येईल, असा त्यांचा निष्कर्ष होता.

### वास्तववादी भूमिका

डॉ. मझरुल हक् यांचा निबंध ज्यास्त वास्तववादी भूमिकेवरून लिहिला गेला होता. अध्यात्मशास्त्र व तत्त्वज्ञानाच्या बारीक छटा आपल्या आवाक्याच्या बाहेर












आहेत, असें सुरुवातीसच सांगून त्यांनीं आपली सर्व चर्चा समाजजीवनांत प्रत्यक्ष काय घडतें यावर केंद्रित केली. साध्या माणसाची दिशाभूल करणाऱ्या साम्यवादी विचारसरणीला धर्माच्या मदतीनें पायबंद घालतां येईल, हें त्यांनीं मान्य केलें. परंतु तेवढ्यानें कार्यभाग होत नाहीं. आधुनिक संस्कृति जगवायची असेल तर भाकरीचा प्रश्न बुद्धिनिष्ठ मार्गानें सोडविला पाहिजे. धर्माचा येथें विशेष उपयोग नाहीं; कारण धर्म हा पश्चाद्दर्शी आहे, व म्हणून सामाजिक न्यायाच्या ढोबळ कल्पनेपलीकडे धर्माकडून कांहीं अपेक्षा करतां येत नाहीं. दुसरें असें कीं, सर्व जागतिक धर्मांची शिकवणूक एकसारखी उदात्त असली तरी परधर्मीयांबद्दलची प्रत्येक धर्माची भावना तुच्छतेची असते. म्हणून बहुधर्मी राज्यांत वेगवेगळया धार्मिक समूहांच्या मध्यें संवादित्व कसें निर्माण करावयाचें, हा आधुनिक काळांत एक महत्त्वाचा प्रश्न होऊन बसला आहे. पूर्वीच्या मानानें आज धार्मिक सहिष्णुता जर जास्त दिसत असली तर त्याचें कारण धर्माबद्दलची तीव्रतर आस्था नसून धर्माबद्दलची उदासीनता आहे.

हक्साहेबांच्या निबंधावर चर्चा अजिबात झाली नाहीं असें म्हटलें तरी चालेल. याचें कारण त्यांचीं मतें बऱ्याच लोकांना मान्य होतीं, असें एका मित्रानें मला नंतर सांगितलें. दुसरें कारण असेंहि असूं शकेल कीं त्यांच्यानंतर श्री. हसन झमान यांनी वाचलेला निबंध धर्माची आवश्यकता प्रतिपादन करणारा असल्यामुळें डॉ. हक् यांच्या निबंधावर टीका करण्याचें कारण कांहीं लोकांना उरलें नसावें.

वेगवेगळया निबंधावर सेमिनारमध्यें अगदी मनमोकळेपणानें चर्चा झाली. चर्चेत भाग घेणाऱ्यांपैकीं ढाका विद्यापीठांतले श्री. ज्योतिर्मय गुहा, इंडोनेशियाचे श्री. तकदीर अलीशाबाना, लेबानॉनचे श्री. बेशारा गोरायेब व हैद्राबादचे डॉ. सिद्दीकी यांचा उल्लेख प्रामुख्यानें करावा लागेल. श्री. गुहा यांच्या म्हणण्याचा आशय असा कीं मनुष्याची उत्क्रांति बुद्धिगम्य निसर्गातूनच झाली असल्यामुळें त्याच्या नैतिक भावनेचें मूळ मनुष्यस्वभावांत अंतर्भूत असलेल्या विवेक बुद्धींतच शोधलें पाहिजे; नैतिक भावनेचा धर्माशीं कुठल्याहि प्रकारचा अपरिहार्य संबंध नाहीं. प्रा. तकदीर अलीशाबाना यांनीं धर्माचा एक नीतिप्रेरक शक्ति म्हणून विचार करतांना त्याच्याकडे आपण ऐतिहासिक व तुलनात्मक दृष्टीनें पाहिलें पाहिजे, असें म्हटलें. तसें न केल्यास, निरनिराळया धर्मांच्या शिकवणुकींचा गाभा एकच असतांना मानवसमाजांत संस्कृति, कला, नीति, इत्यादि क्षेत्रांत दिसणारे फरक समजूं शकणार नाहींत. श्री. बेशारा गोरायेब हे अलीशाबानांच्याहि पुढे जाऊन म्हणाले की धर्माला सामाजिक व्यवहारांत ऐहिक तत्त्वप्रणाली ( secular ideology ) चें स्थान देणें धोक्याचें होईल. कारण, प्रत्येक तत्त्वप्रणालींत विचारांचा सांचेबंदीपणा आणि परिवर्तन व विकास घडवून आणण्याच्या स्वातंत्र्याचा अभाव, हे अभिप्रेत असतात. प्रा. सिद्दीकी यांनीं हुकूमशाहीला पोषक असेंसुद्धां धर्माचें एक स्वरूप असूं शकतें, अशी धोक्याची सूचना दिली.

**कांहीं प्रश्न**

वर सांगितल्याप्रमाणें चर्चा अगदीं मनमोकळेपणानें झाली. परंतु वेळेच्या अभावीं कुठल्याहि प्रश्नाचें काटेकोर विश्लेषण करणें शक्य नव्हतें. कितीतरी महत्त्वाचे प्रश्न फक्त उल्लेख करून सोडून देणें भाग पडलें. उदाहरणार्थ धार्मिक शिक्षणाचा बौद्धिक आशय काय असणार ? जोपर्यंत धार्मिक शिक्षण म्हणजे नैतिकशिक्षण एवढाच अर्थ केला जातो तोपर्यंत जास्त वाद घालण्याचें कारण नाहीं. परंतु नैतिक मूल्यांचा अंतिम आधार म्हणून धर्माधिष्ठित अध्यात्मशास्त्राकडे बोट दाखविण्यांत येतें, तेव्हां एक दुसरा प्रश्न उद्भवतो. तो असा : प्रत्येक धर्माचे दोन महत्त्वाचे भाग असतात. एक बुद्धिगम्य कल्पनाविलास, कीं ज्याच्या मदतीनें मनुष्य विश्वाची व मानवाची उपपत्ति, इत्यादि प्रश्नांचे निराकरण करतो; व दुसरा भाग म्हणजे या कल्पनाविलासावर रचलेलें त्याचें नीतिशास्त्र, कीं ज्याच्या मदतीनें मनुष्य सामाजिक जीवनांत संवादित्व निर्माण करण्याचा प्रयत्न करतो. नीतिशास्त्राचें हें धार्मिक अधिष्ठान ग्राह्य धरलें तर आधुनिक विज्ञान व ज्ञानमीमांसा यांच्याशी प्रतारणा केल्यासारखें होईल; म्हणज पर्यायानें एका महत्त्वाच्या नैतिक मूल्यावरच आघात केल्यासारखें होईल. बरें, धार्मिक शिक्षणाचा आशय केवळ नैतिक स्वरूपाचा ठेवला, व विश्वाची उत्पत्ति व गतिनियम मनुष्याची उत्क्रांति व त्याचे, सामाजिक व







मानसिक व्यवहार, इत्यादि बुद्धिगम्य बाबतींत विज्ञाननिष्ठ दृष्टिकोनाचा स्वीकार केला, तर अशा शिक्षणाला ' धार्मिक ' असें अभिधान तरी का लावावें ?

धर्माचे देशकालनिरपेक्ष सिद्धांत कुठले, आणि तत्कालीन परिस्थितीचें प्रतिबिंब एवढेंच महत्त्व असलेले सिद्धांत कोणते, हें ठरविण्याचा व्यक्तिनिरपेक्ष मार्ग कोणता ?

प्रेषितांना आलेली दिव्यतत्त्वाची प्रचीति खरोखरच मनुष्याच्या बुद्धीच्या पलीकडच्या कांहीं सत्याची निदर्शक आहे, असें समजणें मानसशास्त्राच्या दृष्टीनें चुकीचें होणार नाहीं काय ?

धर्माला संस्थात्मक स्वरूप प्राप्त झाल्यानें तो मनुष्याला मार्गदर्शन करण्याच्या कामांत जवळजवळ निरुपयोगी ठरतो. ( " Institutionalization makes religion trivial " ), असें श्री. हसन झमान म्हणाले. परंतु धर्माला जर संस्थात्मक स्वरूप येऊं द्यायचें नसेल, तर त्याची सामाजिक दृष्ट्या किती उपयुक्तता राहणार असा प्रश्न सहजच पुढें येतो.

शेवटीं, धर्माचे आदेश व बुद्धीचे निष्कर्ष या दोहोंमध्यें विसंवादित्व आहे असें दिसलें तर काय ? श्री. अली अशरफ एकदां म्हणाले कीं अशा प्रसंगीं धर्माचा आदेश शिरसावंद्य मानला पाहिजे ( " Believe first, and then you will understand " ). परंतु याचा अर्थ असाच नव्हे कां कीं, प्रकृतीनें मानवाला दिलेली सर्वोत्तम देणगी, म्हणजे त्याची चिकित्सक व सर्जनशील विचारशक्ति, ही त्यानें स्वेच्छेनें अंधश्रद्धेला गहाण टाकावी ? आणि जोपर्यंत मनुष्याला संपूर्णतः स्वतंत्रपणें विचारांची धांव घेण्याची सामाजिक व सांस्कृतिक मोकळीक नाहीं तोपर्यंत त्याचें स्वातंत्र्य संपूर्ण व सुरक्षित आहे असें तरी कसें म्हणतां येईल ?

---

## " हिंदुनाशाष्टक "

" पुढें कालेंकरून संस्कृत भाषा सुटोन प्राकृत भाषा जहाल्या. तेव्हां असा भ्रम पडला कीं प्राकृत भाषण बोलावें आणि ज्यास विद्या पाहिजे त्याणें संस्कृत पढून विद्या शिकाव्या; कारण कीं प्राकृत भाषेंत ग्रंथ नाहींत, हें एक कारण.

दुसरें असें कीं जों जों प्राकृत भाषा वाढत गेली तों तों संस्कृतचा अंधार जहाला; विद्या जास्ती वाढविणें राहिलें आणि लोकांची अशी समजूत पडली कीं ज्यांनीं संस्कृतांत ग्रंथ लिहिले, ते देव होते आणि तसे ग्रंथ लिहिणें हें काहीं मनुष्याचें काम नव्हे, हें दुसरें कारण. तिसरें कारण असें आहे कीं ब्राह्मणांचीं कुळें कायम जाहलीं. येणेंकरून जो ब्राह्मण मूर्ख, विद्या शिकत नाहीं, त्यास असें भय राहिलें नाहींच कीं मूर्खपणामुळें नीचत्व येईल ... ...

चवथें कारण असें दिसतें कीं देशांत रहाणें वगैरे जे प्रतिबंध पूर्वीचे शास्त्रकारांनीं केले त्यांचे हेतू न जाणून त्यास धर्म म्हणूं लागले. पांचवें कारण असें दिसतें कीं कलियुग निघालें आहे, याजमुळें लोकांचा नाश व दुर्गुणप्रवृत्ति व्हावी हा ईश्वरसंकेत आहे असें भय शास्त्रकारानें लिहिलें आहे. तरी त्याचा हेतु न जाणून लोक ते यथातथ्य मानू लागले. सहावें – प्रारब्धवाद म्हणून जें घडतें तें पूर्वींच ईश्वर लिहितो, ते कोणत्याही उद्योगानें फिरावयाचें नाहीं. सातवें-पूर्वींचे लोक ऋषि व देव होते, मनुष्य नवते. यास्तव जे वडील करीत आले तेंच करावयाचें. नवीन मार्ग काढावयाचा नाहीं. आठवें कारण ज्या ज्या गोष्टी, चालीरिती लोकांमध्यें आहेत त्या सर्व धर्मच. व्यवहार धर्म; ईश्वरभक्तीही धर्म; पागोटें, धोतर, आंगरखा घालावा हें सर्व धर्मामध्यें मोडूं लागलें. ही समजूत विलक्षण लोकांची पडली.

या आठ कारणांचें नांव मी "हिंदुनाशाष्टक" ठेवलें आहे.

– लोकहितवादी – शतपत्रें








प्रा. श्री. गो. हुल्याळकर

# विज्ञान आणि सामाजिक नीति

आज जग एका क्रान्तिरेषेवर उभें आहे. विज्ञानानें आपल्या हातीं एवढी शक्ति, एवढें सामर्थ्य दिलें आहे कीं जगाचें नंदनवन क्षणमात्रांत करून टाकतां येईल अशी आशा मानवाला वाटूं लागली आहे. पण गेल्या कांहीं वर्षांचा जगाचा इतिहास पाहिला म्हणजे हेंच विज्ञानसामर्थ्य भस्मासुराप्रमाणें जगाच्या डोक्यावर हात ठेवील अशी भीतीहि निर्माण झाली आहे. आज आपण जगाचे नागरिक कोणच्या मूल्यांना महत्त्व देतों त्यावर जगाचें भवितव्य ठरणार आहे.

## नवसमाजाचें अधिष्ठान

वासना व प्रज्ञा या मानवाच्या दोन मोठ्या शक्ती आहेत. वासनात्मक जीवनांत त्यानें आजपर्यंत पुष्कळच प्रगति केली आहे. त्यानें मोठें यश मिळविलें आहे. पण त्याचें प्रज्ञात्मक जीवन अजून अगदीं अप्रगल्भ आहे. आपल्या प्रज्ञेनें त्यानें एवढें जाणलें आहे कीं आपल्या वासनांचें योग्य नियंत्रण केलें तर मानवी जीवनाला पूर्णता आणणें शक्य आहे. वासनांच्या या नियंत्रणासाठींच नीतिबंधनांची आवश्यकता वाटूं लागते. मानवाच्या वासना, तृष्णा, आकांक्षा यांचें स्वरूप बरेंचसें मिश्र व चमत्कारिक आहे. मानव जितका आत्मनिष्ठ तितकाच समाजनिष्ठ आहे. आणि त्याच्या या दोन्ही निष्ठांना समाजधारणेच्या दृष्टीनें सारखेंच महत्त्व आहे. संत, कलाकार, कवि व शास्त्रज्ञ यांच्या जीवनाचें खरें रहस्य त्यांच्या आत्मनिष्ठेंत आहे. त्या आत्मनिष्ठेच्या एकान्तांत ते जी साधना करतात तिचा जगाला उपयोग असला तरी त्याक्षणीं हे पुरुष जगाला अगदीं विन्मुख असतात. ते जगाचा विचारहि करीत नसतात. म्हणून नीतिबंधनांचा विचार करतांना मानवी जीवनाच्या या दोन्ही अंगांचा, वैयक्तिक व सामाजिक अशा त्याच्या दोन्ही प्रवृत्तींचा हिशेब केला पाहिजे. नाहींतर तें नीतिशास्त्र अपूर्ण व अक्षम असेंच होईल.

मानवी जीवनाचा विकास होत आला तसतसा त्याच्या नीतिशास्त्राचाहि विकास होत आला आहे. या विकासांत मानवानें द्विविध बंधनें निर्माण केलीं आहेत. सामाजिक व्यवहारासाठीं कायद्याचें व वैयक्तिक जीवनासाठीं विवेकाचें बंधन त्यानें घातलें. हीं सर्व बंधनें मानवाच्या योगक्षेमासाठीं आणि समाजाच्या संरक्षणासाठींच होतीं हें खरें. पण आतांपर्यंतच्या सनातन नीतिशास्त्रानें वर सांगितलेल्या मानवी जीवनाच्या दोन अंगांपैकीं सामाजिक अंगाचा विचार तितकासा केला नाहीं. मानवाच्या वैयक्तिक जीवनावर बंधनें घालतांना मनुष्य जणुं काय समाजनिरपेक्ष, परिस्थिति-निरपेक्ष प्राणी आहे असें समजूनच शास्त्रज्ञांनीं त्याला विधिनिषेध घालून दिले. आज शास्त्रज्ञांचा दृष्टिकोन बदलला आहे. आज नीतिशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ यांनीं सहकार्यानें नवें नीतिशास्त्र सांगितलें पाहिजे. ज्या परिस्थितीमुळें मनुष्य अनाचाराला प्रवृत्त होतो ती नाहींशी करून त्याला सर्वांगीण व परिपूर्ण जीवन कंठण्यास उपयुक्त असे नीतिनियम सांगितले पाहिजेत. वासना, तृष्णा यांचा केवळ निषेध करून आतां भागणार नाहीं. त्यांना योग्य नियमन लावून त्यांतूनच मानवाच्या सर्जनशक्ति कशा विकसित होतील याकडे लक्ष दिलें पाहिजे.













अनुक्रमणिका

वरील विवेचनावरून एक गोष्ट निश्चित दिसते कीं अन्नपाणी, वस्त्र, घर या ज्या मानवाच्या प्राथमिक गरजा त्या तृप्त केल्यावांचून त्याच्याठायीं नीतिनिष्ठा निर्माण होणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें मानव हा सामाजिक, समूहनिष्ठ प्राणी आहे हेंहि ध्यानांत ठेवलें पाहिजे. या दृष्टीनें ज्या समाजांत तो राहणार त्याला कांहीं व्यवस्था, रचना असणें अवश्य आहे. त्यांत मानवाचे हक्क, त्याचीं कर्तव्यें व त्याच्यावरील बंधनें यांचा योग्य मेळ असला पाहिजे. याचा अर्थ असा कीं मानवामधील पाशवी व दैवी, शारीर व आत्मिक असे दोन्ही घटक ध्यानांत घेऊन त्यांचा समन्वय करूनच यापुढें समाजरचना झाली पाहिजे.

## विज्ञानाचें स्थान कोणतें ?

गेल्या तीनचारशें वर्षांत विज्ञानानें मानवाच्या भौतिक परिस्थितींत आमूलाग्र परिवर्तन घडवून आणलें आहे. बंदुकीची दारू, होकायंत्र, वाफ, वीज त्याचप्रमाणें या शक्तींनीं, रेल्वे, तारायंत्रें, विमानें यांनीं जगाचें बाह्यरूप म्हणजेच मानवाची परिस्थिति सर्वस्वी पालटून गेली आहे. शासनसंस्था अतिशय समर्थ झाली. प्रवास सुलभ होऊन जगाचे अज्ञात भाग उजेडांत आले. दळणवळण वाढल्यामुळें जगांतले भिन्न समाज एकत्र येऊन जग लहान झालें. आणि नैसर्गिक शक्तींवर मानवाचें प्रभुत्व प्रस्थापित होऊन त्या शक्तींचा आपल्या उत्कर्षासाठीं वापर करण्याची विद्या त्याला अवगत झाली. त्यामुळें मनुष्याच्या मनांत फार मोठ्या आशा निर्माण झाल्या आहेत. दारिद्र्य नष्ट करून, समृद्धि निर्माण करून आपलें जीवमान वाढवितां येईल, अहोरात्रींचे कष्ट आतां कमी होतील; अराजक नाहीसें करून मानवी जीवन जास्त सुखी, जास्त समृद्ध व संपन्न करणें सहज शक्य होईल, अशी उमेद मनुष्याला वाटूं लागली आहे.

पण १९४५ सालीं हिरोशिमावर पडलेल्या ॲटम बॉंबनें मानवाच्या या आशा गोठवून टाकल्या आहेत. या बॉंबच्या शोधानें मानवानें निसर्गावर केवढें प्रभुत्व मिळविलें आहे, त्याच्या हातीं केवढी शक्ति आली आहे हें ध्यानांत आलें. पण या शोधाचा मानवानें जो उपयोग केला त्यामुळें ही शक्ति शाप ठरणार कीं काय अशी भीति वाटूं लागली आहे. या पुढच्या युद्धांत ही विज्ञानशक्ति उपयोगांत आणली गेली तर मानवी संस्कृतीच नव्हे तर अखिल मानव जातच नष्ट होण्याचा संभव आहे. आपल्याला अणुविच्छेदनविद्या मानवसंघटनविद्येच्या आधीं हस्तगत झाली हें मोठें दुर्दैव आहे. यामुळें विज्ञानाचा नीतीशीं मोठा संघर्ष निर्माण झाला आहे. कारण, विज्ञानानें मानवाचा जगण्याचा हक्कच आतां हिरावून घेतला आहे. पहिल्या महायुद्धांतच विज्ञानाचें घातक सामर्थ्य दिसूं लागलें होतें. तरी पुढील पंचवीस वर्षांत हे दोष भांडवलशाहीचे आहेत, समाजरचनेचे आहेत असें म्हणून मानवानें स्वतःची समजूत घातली होती. पण दुसऱ्या महायुद्धानें त्याचे डोळे उघडले. विज्ञानाचें अमर्याद सामर्थ्य आणि मानवाची अधम पाशवी वासना यांचा तेथें समागम झाला. विज्ञानमंदिर हा पूर्वी एकजीव निर्झर आहे असें वाटत होतें. तें आतां नरककुंड ठरत आहे. मानवी जीवनांत विज्ञानाचें स्थान तरी काय याचा आतां फेरविचार होणें अवश्य आहे.

## समस्येचें स्वरूप

संध्यांची ही समस्या विज्ञानाच्या मूलभूत योग्यतेविषयीं नाहीं. सत्याचें संशोधन हें केव्हांहि मानवाला प्रियच आहे. आणि त्याचें महत्त्व अपार आहे. आपल्या संशोधनशाळेंत जगाकडे पाठ फिरवून एकान्तांत बसलेला शास्त्रज्ञ कोणचेंहि सत्य शोधूं काढूं लागला तरी त्याच्यापासून जगाला कसलाहि उपद्रव होणार नाहीं. प्रश्न निर्माण होतो तो शास्त्रज्ञ आपल्या संशोधनशाळेंतून बाहेर पडून जगाच्या व्यवहाराच्या आखाड्यांत पाऊल टाकतो












तेव्हां, नीतिबंधनांच्या अभावी तो आपल्या जवळची महाशक्ति कोणाच्याहि हातीं देतो. स्वतः विज्ञान हें उदासीन असेल, पण राजकारणी, मुत्सद्दी, सत्ताधारी लोकांच्या हातीं तें जातांच तें संहारक रूप धारण करतें. म्हणूनच विज्ञानाच्या या महाशक्तीवर नैतिक व सामाजिक नियंत्रण घालणें अवश्य झालें आहे. कारण विज्ञानाचा मूळ हेतु कितीहि उदात्त असला तरी तें जेव्हां राजकीय, आर्थिक वा धार्मिक क्षेत्रांतील सत्ताधाऱ्यांना वश होतें, तेव्हां तो हेतु विफल होतो. त्यामुळें आज विज्ञान सर्वस्वी घातक ठरत आहे. नैसर्गिक धनांचा संहार होत आहे, मानवव्यक्ति सत्ताधाऱ्यांच्या हातचीं बाहुलीं बनत आहेत. व मानवी मनाची विचारशक्ति बंधनांत पडत आहेत. रसेलनें म्हटल्याप्रमाणें शास्त्रानें आज सत्ताधाऱ्याचें सामर्थ्य इतकें वाढविलें आहे कीं पूर्वयोजना आणि आखणी करून त्या बरहुकूम मानवाचे समाजचे समाज निर्माण करणें त्यांना शक्य झालें आहे. त्यामुळें व्यक्तीचे मूलभूत हक्कच नष्ट होत आहेत. या हक्कांचें संरक्षण करणें ही जगापुढची एक फार मोठी समस्या आहे.

## जगाचें संघराज्य हवें

यासाठीं विज्ञानाच्या या महाशक्तीवर नियंत्रण घालणें अत्यावश्यक आहे. येथें नियंत्रण याचा अर्थ नीट ध्यानांत घेतला पाहिजे. हें नियंत्रण सत्यसंशोधनावर नाहीं. त्या बाबतींत शास्त्रज्ञाला पूर्ण स्वतंत्र्य दिलें पाहिजे यांत शंकाच नाहीं. त्याचप्रमाणें ज्ञात झालेल्या सत्याविषयीं इतर शास्त्रज्ञांशी विचारविनिमय करण्याचेंहि स्वातंत्र्य शास्त्रज्ञाला अवश्य दिलें पाहिजे. प्रश्न निर्माण होतो तो येथून पुढें. या सत्याचा, विज्ञानानें केलेल्या या संशोधनाचा समाजकल्याणाला जर उपयोग व्हावयाचा असेल तर या धनावर सर्व मानवजातीची सत्ता प्रस्थापित झाली पाहिजे. नीतिबंधनांचा विचार निर्माण होतो तो येथें होतो. आणि हीं बंधनें म्हणजे केवळ नीतिशास्त्राचें पठण किंवा पाठण नव्हे. कारण, अंतीं मानवाचें मन किती उदार, किती संयमी, किती विवेकी होईल त्यावर सर्व अवलंबून आहे. मानवाचा मूळ दृष्टिकोनच बदलणें अवश्य आहे. संकुचित निष्ठा नष्ट करून त्याच्या मनांत अखिल मानवनिष्ठा निर्माण केल्या पाहिजेत. मानव्य हेंच यापुढें आपलें अंतिम असलें पाहिजे. यूनोनें युनेस्को या शाखेची स्थापना केली त्यामागें हाच हेतु असावा असें वाटतें.

विज्ञानावर कांहीं नैतिक बंधनें घालणारी संस्था स्थापणें हें आज अत्यावश्यक आहे हें आतां स्पष्ट होईल. त्याबरोबरच दुसरीहि एक गोष्ट स्पष्ट होईल ती ही कीं संस्था म्हणजे कोणच्याहि एका देशाची असतां कामा नये; ती जागतिक संघटनाच असली पाहिजे. या दृष्टीनें पाहतां आज खरी आवश्यकता आहे ती अखिल जगाच्या संघराज्याची. हें संघराज्य जगाचे आर्थिक व सामाजिक प्रश्न सोडविण्यास समर्थ असलें पाहिजे. या प्रश्नामुळेंच जगाच्या शांततेला धोका निर्माण होत असतो. हें साधावयाचें तर या जगत् संघराज्याजवळ आक्रमक राष्ट्रांना वेसण घालण्याइतकें सेनासामर्थ्य असलें पाहिजे. अर्थात् केवळ सैन्यानें भागेल असें नाहीं. मानवाच्या निष्ठाच बदलल्या पाहिजेत. आपापल्या राष्ट्रावरची निष्ठा वर्ज्य समजावी असा अर्थ नाहीं. जगत्–राज्यनिष्ठा व स्वराष्ट्रनिष्ठा यांचा यापुढें समन्वय घालण्यास प्रत्येक देशानें आपल्या नागरिकास शिकविलें पाहिजे. यासाठीं आपल्या इतकेच दुसऱ्याचेहि हक्क पवित्र आहेत हें तत्त्व मानवाच्या मनांत पक्कें रुजलें पाहिजे.

## व्यक्ति हाच आधार

जगद्राज्याचा विचार मनांत येतांच आज यूनो ही संस्था डोळ्यापुढें येते. ही प्रचंड जबाबदारी शिरावर घेण्यास आज ही एकच संस्था समर्थ आहे. कारण ती खरीखुरी लोकायत्त संस्था आहे. लोकसत्ता ही तत्त्वतःच मुळीं विश्वव्यापक असते. आणि यूनोची










घडण पाहिली तर ती सर्वथा अशाच तत्त्वावर झालेली दिसते. यूनोच्या सनदेंत व तिच्या प्रस्तावनेंतहि लोकशाहीच्या तत्त्वांचा संपूर्ण पुरस्कार झालेला दिसतो. दुसऱ्या महायुद्धानंतर लोकांच्या ही गोष्ट स्पष्टपणें ध्यानांत आली कीं विज्ञानाच्या वाढीमुळें जगाचे भिन्न समाज अत्यंत परस्परावलंबी झाले आहेत. आणि त्यामुळें दण्डधारी साम्राज्यसत्ता किंवा व्यक्तिवादी लोकसत्ता हे दोनच विकल्प जगापुढें आहेत. लोकांनीं पहिला वर्ज्य मानून दुसरा स्वीकारण्याचें ठरविलें आहे.

युद्धानें आतांपर्यंत कोणचेंहि प्रश्न सोडविण्यांत यश मिळविलेलें नाहीं. सत्ताधारी व बलवान् राष्ट्रांतील थोर व्यक्तींच्या निर्लोभ, निःस्वार्थी मार्गदर्शनानेंच, त्यांनीं स्वोदाहरणानें निर्माण केलेल्या नीतिशास्त्रानेंच जगापुढचे गहन प्रश्न सुटतील. कोणी असें म्हणतात कीं अजून आंतरराष्ट्रीय नीतिमत्ता पुरेशी विकसित झालेली नसल्यामुळें व्यक्तींच्या नीतिमत्तेनें हे प्रश्न सुटण्यास मदत होणार नाहीं. पण ही विचारसरणी सयुक्तिक नाहीं. खरी गोष्ट अशी आहे कीं वैयक्तिक जीवनांतील आपली नीतिमत्ता असावी तितकी दृढ व कणखर नाहीं. म्हणूनच आंतरराष्ट्रीय व्यवहार विकट होऊन बसला आहे. आपल्या वैयक्तिक जीवनांतील संकुचित वृत्ति आणि तज्जन्य संघर्ष हे आपल्याला अजून टाळतां आलेले नाहींत. साहजिकच व्यापक सामाजिक व्यवहारांतहि ते जास्त उग्र होतात. आणि मग हें असेंच चालायाचें असें मानून आपण स्वस्थ बसतो. तेव्हां नीतिकल्पनांचा पायाशुद्ध विचार झाला पाहिजे. नीतिविचार सर्व जीवनव्यापी आहे. आणि तसा तो असेल तरच त्याला महत्त्व आहे. हें लक्षांत आलें तर वैयक्तिक नीतिमत्ता व आंतरराष्ट्रीय नीतिमत्ता यांचा किती दृढ संबंध आहे हें आपल्याला कळून येईल.

## पंचशील व यूनो

या बाबतींत इंग्लंड, फ्रान्स सारख्या पाश्चात्त्य लोकसत्ता, सोव्हिएट रशिया हीं जीं यूनोची सभासद असलेलीं मोठीं राष्ट्रें आहेत त्यांच्यावर मार्गदर्शनाची जबाबदारी आहे. राष्ट्रांराष्ट्रांतील परस्परसंबंधाचे नियम म्हणजेच आंतरराष्ट्रीय नीति. या नीतीचें शास्त्र अजून झालेलें नाहीं. तोपर्यंत आपले महामंत्री पंडित नेहरू यांचें पंचशील तत्त्व हें जगाला मार्गदर्शक होईल. सुदैवानें जगांतील बहुसंख्य राष्ट्रांनीं तें मान्य केलें आहे. या दृष्टीनें पाहतां आपल्या महामंत्र्यांनीं जगाला दिलेलें हें देणें विनमोल असें आहे. पंचशील तत्त्व प्रत्येक ठिकाणीं यशस्वी झालें नसलें तरी अंदाधुंदी, अराजक माजलेल्या कित्येक देशांत त्याचा प्रभाव दिसून आलेला आहे. अशा प्रयत्नांतून मानवापुढच्या सगळया विकट समस्या नीट जाणून घेण्याचा जर प्रयत्न झाला तर जगांतील राष्ट्रांची नीतिमत्ता उंचावेल, परिपक्व दशेला येईल असें वाटतें. आज यूनो ही भावी जगाची आशा आहे. कारण, मानवाला ' मानव ' म्हणून जाणण्याचा या संस्थेचा प्रयत्न चालू आहे.

## ध्येय व व्यवहार यांची फारकत

युद्धामुळें आपल्या शत्रूचा, त्याच्या भौतिक वैभवाचा आपण नाश करतों असें नाहीं तर त्यानें मानवाच्या मानवत्वाचाहि अधःपात होतो. युद्ध ही एक वारुणी आहे. तिनें माणसें धुंद झालीं कीं सांस्कृतिक व आर्थिक मूल्यें तीं पायदळीं तुडवतात. ' विजय ' हें एकच मूल्य ते जाणतात. पण तेंहि अत्यंत अल्पसंख्याकांच्या हातीं येतें. युद्धानें होणारा संहार व विध्वंस ध्यानांत घेतला तर ' युद्धें थांबविण्यासाठीं युद्ध ' हें तत्त्व किती घातक आहे तें कळून येईल. युद्ध म्हणजे कांहीं सत्तालोभी समर्थांनीं मानवी जीवनाशीं चालविलेला प्राणघातक खेळ आहे. आतां बहुतेक विचारवंतांना हें मान्य झालें आहे. खरें पाहतां युद्धाचें समर्थन करणें विचारी बुद्धीला फार कठीण आहे. युद्ध हें सर्व दृष्टींनीं एक भयंकर पाप आहे, आणि शांतता हेंच पुण्य आहे. म्हणून जग-










दैन्याचा प्रश्न हा खरा नैतिक प्रश्न आहे. आणि त्यासाठीं प्रत्येक देशांतल्या नागरिकांना सहकार्य व सहजीवन यांचें शिक्षण देणें अवश्य आहे.

आज जगापुढें विकट समस्या येऊन पडल्या आहेत व सर्वनाशाचा समय येऊन ठेपला आहे तो नीतिकल्पनांच्या ऱ्हासामुळें होय. विज्ञानाची आज मुळींच कमतरता नाहीं. आज उद्योगधंद्यांचा पसारा वाढत आहे. तंत्रज्ञानाची विलक्षण प्रगति झाली आहे. शिक्षणाचा प्रसार होत आहे. आणि तरीहि मानवाचे प्रश्न सुटत नाहींत हें फारच खेदकारक आहे. याचें कारण म्हणजे एकच. आज ध्येय आणि व्यवहार यांची फारकत झाली आहे. आपली संस्कृतीच आज खालावली आहे. संस्कृति म्हणजे तरी काय. उच्च-ध्येय, निष्ठा, तत्त्वें म्हणजे संस्कृति. यांचा ऱ्हास म्हणजेच संस्कृतीचा ऱ्हास. विज्ञान हें मानवाला घातक ठरूं द्यावयाचें नसेल तर आपल्या डोळ्यापुढें उच्च सामाजिक तत्त्वें सतत राहिलीं पाहिजेत; आणि न्यायान्यायाच्या कल्पना विकसित झाल्या पाहिजेत. आपल्या प्राचीन संस्कृतीचें 'जुनें ठेवणें' आपण आकळून घेऊन सध्यांच्या युगांतल्या सामाजिक व वैयक्तिक प्रश्नांची सोडवणूक त्या दृष्टीनें केली पाहिजे.

### "तुझें आहे तुजपाशीं"

तुकाराम महाराजांनीं म्हटल्याप्रमाणें 'तुझें आहे तुजपाशीं' अशी वस्तुस्थिति आहे. ते अंत-रीचे गुण आपण शोधून काढले पाहिजेत. आणि आपलें जीवन निरामय व सुखी केलें पाहिजे. समृद्ध केलें पाहिजे. नीतिशास्त्राचें हेंच कार्य आहे. भौतिक परिस्थिति जाणून जीवन समृद्ध करण्याचें शास्त्र म्हणजेच नीतिशास्त्र. त्याच्या साहाय्यानें आज आपण विज्ञानशक्तीला माणसाळविली नाहीं. आत्मिक साम-र्थ्यानें तिचें नियंत्रण केलें नाहीं तर पंडितजींनीं अनेकवार सांगितल्याप्रमाणें सर्वनाश ओढवल्या-वांचून राहणार नाहीं. "विज्ञानानें मानवाची प्रज्ञा निश्चितपणें विकसित झाली आहे. तिला निराळा रूपरंग आला आहे. मानवाचें मन त्यानें जास्त विशाल व समर्थ झालें हें खरें; पण विज्ञान म्हणजेच सर्व जीवन नव्हे." हे डॉ. राधाकृष्णांचे उद्गार अगदीं यथार्थ आहेत. या पृथ्वीच्या पाठीवर मान-वाला सुखासमाधानानें रहावयाचें असेल तर विज्ञा-नाची महाशक्ति नीतीच्या रसायनानें सौम्य करणें अवश्य आहे.[१]

---

### दोन्हीं प्रकारचीं माणसें हवींत

"देशाची खरी उन्नती होण्यास व तेथील व्यापार-धंदे उत्तम रीतीनें चालण्यास दोन प्रकारच्या मनुष्यांची फार आवश्यकता असते. पहिल्या प्रकारचीं मनुष्यें म्हटलीं म्हणजे सृष्टीशास्त्रांचे अभ्यासांत ज्यांचीं मनें इतकीं गढून गेलीं आहेत कीं त्यांस त्यांतच परमानंद व कृतकृत्यता वाटून ऐहिक सुखें तुच्छ वाटूं लागतात, व ऐहिक दुःखांनीं त्यांच्या मनांचें स्वास्थ्य मोडत नाहीं; आणि त्यामुळें स्वाभाविक व व्यावहारिक आव-श्यकता भागविण्याचे पलिकडे द्रव्यसंचय करणें त्यांस निरर्थक वाटतें व त्याचा ते कंटाळा करितात; तसेंच आपल्या मागें आपली फारशी कीर्ति राहिली नाहीं तरी बेहेत्तर आहे, असें समजून ते तिची म्हणण्या-सारखी पर्वाच बाळगीत नाहींत. दुसऱ्या प्रकारचीं मनुष्यें म्हणजे केवळ ह्यांच्या विरुद्ध होत. तीं अशीं कीं ज्यांचा सर्वकाळ द्रव्यप्राप्तीच्या विवंचनेंत जातो, ज्यांचा अभ्यास, विचार, शोध, कल्पना व कृति हीं सर्व केवळ अधिकाधिक द्रव्यप्राप्तीसाठीं असतात, व ज्यांत आपल्या आयुष्याची धन्यता त्यांतच वाटते; अशा दोनहि प्रकारच्या मनुष्यांचें परस्परांशीं जुळत नाहीं. एकास दुसरा तुच्छ वाटत असतो, व प्रत्येक आपणांसच समाजाचा खरा हितकर्ता समजतो. परंतु समाजास दोनहि प्रकारच्या मनुष्यांची अत्यंत गरज आहे, व त्यानें दोघांसहि मान दिला पाहिजे".

**गो. ग. आगरकर** – केसरींतील निवडक निबंध पु. २ पृ. १९३.

---

१ अन्नमलाइनगर येथील अ. भा. तत्त्वज्ञान परिषदेच्या ३१ व्या अधिवेशनांतील "नीति-शास्त्र व सामाजिक तत्त्वज्ञान" विभागाचें अध्यक्षीय भाषण.








## पत्रव्यवहार

### महाराष्ट्रांतील प्राचीन स्थलनामें

श्री. कार्यकारी संपादक, नवभारत यांस—

जानेवारी १९५७ च्या ' नवभारता'च्या अंकांत डॉ. एच्. डी. सांकळिया यांचा ' गुजरात, महाराष्ट्र आणि कर्नाटक यांमधील संबंध आणि पट्टी—हट्टी ' ह्या शीर्षकाचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत त्यांनी श्री. शं. बा. जोशी यांनी पट्टी—हट्टी शब्दांवरून गुजराथ व महाराष्ट्र यांत कर्नाटक संस्कृतीच्या प्रसाराविषयीं काढलेल्या अनुमवांचा फोलपणा उत्तम रीतीनें सिद्ध केला आहे. तीन वर्षांपूर्वी ( डिसेंबर १९५३ च्या ) ' नवभारता'मध्यें श्री. जोशी यांच्या ' मऱ्हाटी संस्कृति ' या ग्रंथाचें परीक्षण करतांना मीहि हेंच दाखविलें होतें. असो.

डॉ. सांकळिया यांचा सिद्धांत योग्य असला तरी त्यांच्या लेखांत कांहीं विधानें चिन्त्य वाटतात. त्यामुळें कोणाचाहि गैरसमज होऊ नये म्हणून खालील माहिती येथें देत आहे :

( १ ) ' पद्र ' हा प्रत्यय केवळ सौराष्ट्र व गुजरातपुरताच मर्यादित होता,' ' पद्र हा प्रत्यय कर्नाटक व महाराष्ट्र यांत एकदांहि आढळत नाहीं' असें डॉ. सांकळियांनी म्हटलें आहे. पण तें बरोबर नाहीं. प्राचीन काळीं खेडेगांवाच्या नावांच्या शेवटीं ' पद्र ' हा प्रत्यय भारताच्या इतर प्रदेशांतहि दिसतो. कांहीं उदाहरणांवरून हें स्पष्ट होईल. गौतमीबलश्रीच्या नाशिकच्या लेण्यांत ' पिसाजिपदक ' व वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या तेथल्याच लेखांत ' समलिपद ' या गांवाचा निर्देश आहे. हे लेख खिस्तोत्तर दुसऱ्या शतकांतले आहेत. वाकाटकांच्या वाशीमच्या लेखांत ( खिस्तोत्तर चौथें शतक ) ' आकासपद्दा'चा उल्लेख अशाच तऱ्हेचा आहे. हीं ग्रामनामें प्राकृत आहेत. छत्तीसगडांतील तीवरदेवाच्या ( खिस्तोत्तर सहावें शतक ) राजीमच्या ताम्रपटांत ' पिंपरिपद्रक ' व त्याच्याच बलोदा ताम्रपटांत ' बिल्वपद्रक ' हीं गांवें उल्लेखिलेलीं आहेत. तेव्हां ' पद्रक ' शब्दान्त गांवें गुजरात-सौराष्ट्रांतच प्रचलित होतीं असें नाहीं.

( २ ) ' महाराष्ट्र व कर्नाटकमध्यें पल्ली हें रूप इ. स. च्या सहाव्या शतकांतच दिसून येतें ' हें विधानहि असेंच विवादास्पद आहे. मानपुरचे राष्ट्रकूट हे दक्षिणमहाराष्ट्रांत राज्य करीत होते. ते वाकाटकांचे समकालीन होते हें मी इतरत्र दाखविलें आहे ( संशोधनमुक्तावलि, सर १, पृ. ७२ ). त्यांच्या कोल्हापूर ताम्रपटांत ' पांडरंगपल्ली'चा निर्देश आहे. वाकाटकांच्या जांब येथील ताम्रपटांत ( एपि. इंडिका, पु. २६, पृ. १६० ) चिंचापल्लीचा उल्लेख आला आहे. यानंतरच्या काळांतहि अशीं नांवें आढळतात.

( ३ ) पाटक व वाटक हे शब्द स्थलनामांच्या शेवटीं गुजरातमध्यें इ. स. च्या सहाव्या शतकांत आढळतात. त्यापुढें एक शतकानंतर वाटक हा शब्द रत्नागिरीच्या बदामी चालुक्यांच्या आलेखांत दिसतो ' असें डॉ. सांकळिया म्हणतात. वास्तविक, पाटक व वाटक हे शब्द भारतांतील सर्व प्रदेशांत दीर्घकाळ प्रचलित होते. उदाहरणार्थ, गुप्तांच्या दामोदरपुर–( बंगाल ) च्या ताम्रपटांतील स्वच्छन्दपाटक, वाकाटकांच्या ताम्रपटांतील बोन्यिकवाटक, प्रवरेश्वरषड्विंशतिवाटक, पवरज्जवाटक, अंजनवाटक इत्यादि स्थलनामें पहा. अशीं अनेक नांवें ( असथीपाटक, थिउलपाटक, वणिआपाटक इत्यादि) गोरखपुरच्या कलचुरिताम्रपटांत ( खिस्तोत्तर अकरावें शतक ) आलेलीं मी माझ्या मागील लेखांत दाखविलीं होतीं.

तेव्हां पद्रक, पल्ली, पाटक व वाटक हे शब्द कर्नाटक, गुजराथ, सौराष्ट्र या भागांतच सीमित नसून इतरत्रहि प्रचलित होते.

नागपूर.
१२ जानेवारी १९५७

—वा. वि. मिराशी







## पुस्तक-परामर्श

जैन धर्म आणि वाङ्मय—डॉ. परशुराम लक्ष्मण वैद्य, एम्. ए.,डी. लिट्., प्रकाशक—नागपूर विद्यापीठ, नागपूर, १९५६. पृ. ९३, किंमत १॥ रुपया.

डॉ. वैद्य हे अर्धमागधी व अपभ्रंश यांचे एक सुप्रसिद्ध पंडित असून जैनधर्म व जैनवाङ्मय यासंबंधी त्यांचा गाढ व्यासंग आहे. नागपूर विद्यापीठांत त्यांनीं १९४३ सालीं जैनधर्मावर चार व्याख्यानें दिलीं होतीं; तींच आतां या पुस्तकरूपानें प्रकाशित झालीं आहेत.

जैन हे हिंदु आहेत कीं नाहींत हा प्रश्न कांहीं दिवसांपूर्वी बराच चर्चिला गेला होता; आणि अजूनहि त्यासंबंधीं अनेकांना शंका आहे. डॉ. वैद्य यांनीं या बाबतींत व्यक्त केलेलें मत योग्य असेंच आहे. हिंदु शब्दाचा व्यापक अर्थ करणें शक्य आहे. (उदा० अमेरिकेंत हिंदु म्हणजे भारतीय असा अर्थ लावला जातो.) व्यापक अर्थानें विचार केल्यास जैन व बौद्ध हे दोन्हीहि हिंदूच होत असें निश्चितपणें म्हणतां येतें. दोन्हीहि आर्यावर्तातच निर्माण झाले आणि दोन्हीहि आर्यसंस्कृतीचा स्वीकार करणारे व पुनर्जन्म व निर्वाण यावर विश्वास ठेवणारे आहेत. तथापि, हिंदु शब्दाचा वेद आणि ईश्वराला विश्वाचा निर्माता मानणारा ब्राम्हण धर्मानुयायी असा अर्थ केल्यास मात्र जैन व बौद्ध यांना हिंदु मानतां येणार नाहीं. केवळ जैन व बौद्धच कशाला, सांख्य व योग हे देखील वेदप्रामाण्य मानीत नाहींत, यज्ञयागाची निर्भर्त्सना करतात, तत्त्वज्ञान व अहिंसेवर भर देतात, जातिभेदाचा स्वीकार करीत नाहींत आणि ईश्वराला सृष्टिकर्ताहि मानीत नाहींत; यामुळें त्यांनाहि अहिंदु म्हणावें लागेल. आणि वेदानुयायी मीमांसक तरी कुठे ईश्वराला सृष्टि व संहारकर्ता मानतात? सर्वदर्शनसंग्रहामध्यें जैन, बौद्ध, सांख्य, योग इत्यादि दर्शनाबरोबरच चार्वाक दर्शनाच्या मताचाहि संग्रह केला गेला आहे. यावरून हेंच स्पष्ट होतें कीं एकाच संस्कृतीचीं बालकें असून देखील वैचारिक भेदामुळें भारतीय दर्शनांना भिन्न भिन्न नांवांनीं संबोधिलें जात होतें.

डॉ. वैद्य यांच्या व्याख्यानांतून जैन धर्मासंबंधीच्या बारीक सारीक प्रश्नांसंबंधीं मिळणारी सूक्ष्म माहिती त्यांचा त्या विषयीचा गाढ व्यासंग दर्शविल्यावांचून रहात नाहीं. ६३ शलाका पुरुष, निह्नव, अस्तिकाय, पदार्थ, नय, स्याद्वाद इत्यादि बहुतेक सर्व विषयांची चर्चा त्यांनीं केली आहे. डॉ. वैद्य हे प्राकृत भाषांप्रमाणेंच संस्कृतचेहि एक गाढे पंडित आहेत. त्यामुळें आपल्या विशाल अध्ययनाच्या साहाय्यानें त्यांनीं जैन धर्माचें तुलनात्मक व आलोचनात्मक विवेचन केलें असतें तर कितीतरी चांगलें झालें असतें. या व्याख्यानांतून आलोचनात्मक दृष्टि दिसून येत नाहीं. आजकालच्या युगांत केवळ विषयाचें विवेचन करणें पुरेसें नाहीं; त्यांचें मूल्यमापनहि करावयास हवें.

डॉ. वैद्य यांच्या म्हणण्यानुसार पार्श्वनाथाचा पंथ हा केवळ साधूंचाच पंथ होता; त्यांत श्रावक व श्राविका नव्हत्या. तथापि हें म्हणणें बरोबर नाहीं. कल्पसूत्रांत असा स्पष्ट उल्लेख आहे कीं पार्श्वनाथानें साधु, साध्वी, श्रावक व श्राविका अशा चार संघांची स्थापना केली होती. आचारांगामध्यें देखील महावीराच्या मातापित्यांना पार्श्वनाथाच्या परंपरेचे अनुयायी म्हणून संबोधण्यांत आलें आहे. पार्श्वापत्य श्रमण केशीकुमार श्रावस्ती आदि शहरांतून साधूंच्या समवेत रहात असत आणि लोकांना उपदेश करीत. यामुळें श्रावक श्राविकांना देखील ते व्रत—उपदेश देत असले पाहिजेत. सेयविया नगरीच्या प्रदेशी राजानें त्यांच्यापासून उपदेश ग्रहण केला होताच. तुंगिया नगरींत असलेल्या पार्श्वमतानुयायी स्थविर श्रमणांचा धर्मोपदेश ऐकण्यासाठीं बरेच श्रावक व श्राविका उपस्थित असल्याचा उल्लेख भगवतीमध्यें आहे. यावरून महावीराप्रमाणेंच पार्श्वनाथानें देखील चतुर्विध

संघाची स्थापना केली होती हेंच सिद्ध होतें. मात्र ती कदाचित् मोठ्या प्रमाणावर नसेलहि.

डॉ. वैद्य यांचें म्हणणें आहे कीं पश्चिमेकडे केकय अर्थात् अफगाणिस्तानमध्यें जैनधर्माचा प्रचार झाला होता. तथापि हें म्हणणेंहि फारसें ग्राह्य वाटत नाहीं. जैन आगमामध्यें ज्या २५ ½ आर्य देशांची गणती केली आहे त्यांत केकयार्धहि आहे. तथापि हा केकय उत्तरेकडील केकय म्हणजे अफगाणिस्तानाहून भिन्न होय. जैन सूत्रांमध्यें केकयच्या अर्ध्या भागाला आर्यक्षेत्र मानण्यांत आलें आहे; यावरून असें दिसतें कीं या प्रदेशांतील थोड्याशा भागांतच जैनधर्माचा प्रसार झाला असावा. कदाचित् उर्वरित भागांत रानटी जमाती रहात असाव्यात. केकय श्रावस्तीच्या ईशान्येस नेपाळच्या तराईत होता. सेयविया ( बौद्धांची सेतव्या ) ही या देशाची राजधानी होती. हें शहर कोशल देशांत होतें. महावीर याच शहरांत राहिला होता.

तथापि या मुद्द्यांमुळें पुस्तकाचें महत्त्व कमी होत नाहीं. भारतीय संस्कृति व वाङ्मय सामान्य माणसांपर्यंत पोहोंचविण्याच्या हेतूनें या व्याख्यानमालेचा उपक्रम सुरू केल्याबद्दल नागपूर विद्यापीठाचें अभिनंदन केलें पाहिजे. भविष्यकाळांतहि तो तसाच चालू राहील अशी आशा आहे.

— जगदीशचंद्र जैन

---

**आहार आणि शरीरपोषण** : डॉ. वि. ना. पटवर्धन, प्रका० नागपूर विद्यापीठ, नागपूर, १९५६, पृ. २८, किंमत १ रुपया.

सुप्रसिद्ध आहारशास्त्रज्ञ डॉ. वि. ना. पटवर्धन यांचीं नागपूर विद्यापीठातर्फे झालेलीं " आहार आणि शरीरपोषण " या विषयावरील हीं व्याख्यानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध करून विद्यापीठानें मराठी वाचकांवर फार मोठे उपकार केले आहेत. दैनंदिन जीवनांतील या अत्यंत जिव्हाळ्याच्या विषयावर मराठींतील ग्रंथसंपत्ति अगदींच तुटपुंजी आहे. हिंदी आहारांतील नेहमीच्या निरनिराळ्या पदार्थांचें शास्त्रीय विश्लेषण करून आहाराचा व आरोग्याचा संबंध व आहारजन्य रोग यांचें अत्यंत सोप्या भाषेंत विवेचन करणारीं हीं व्याख्यानें सर्वांना मार्गदर्शक वाटतील याबद्दल मुळींच संशय नाहीं.

हिंदी आहार हा धान्यावर अधिष्ठित असल्यानें त्यांत कार्बोज्ज प्रमाणाबाहेर आढळतें; आणि शरीराच्या वाढीस व पोषणास आवश्यक असें प्रोत नुसतें कमी प्रमाणांतच नव्हे तर शाकाहारामुळें निकृष्ट प्रतीचें असतें. इतर जीवनोपयोगी पदार्थांची व विशेषत: जीवनसत्वांची कमतरतासुद्धां फारच मोठी असल्यामुळें एकंदरीनें हिंदी आहार शरीरपोषणाच्या व वाढीच्या दृष्टीनें निकृष्ट ठरतो.

निकृष्ट आहार असण्याचें पहिलें कारण दारिद्र्य. त्यांतच अज्ञान व जुन्या रूढ कल्पनांची भर. "पुराणकाळांत रूढ असलेल्या कल्पना, त्यांत तथ्य नाहीं असें आढळून आल्यावरहि, उराशीं बाळगून बसण्यानें कोणाचेंहि कल्याण होणार नाहीं," हा डॉक्टरसाहेबांचा इषारा आहारासारख्या जिव्हाळ्याच्या बाबतींत तरी आमच्या पचनीं पडणें अत्यंत आवश्यक आहे.

ही माहितीपूर्ण व अत्यंत महत्त्वाची पुस्तिका प्रत्येक घरांत असणें व अभ्यासली जाणें फार आवश्यक आहे.

इं. पा.

**वेधशालापंचांगम्** . सं. २०१२–२०१७ : रचयित्री वेधशाला विद्वत्समितिः, प्रका०: वेधशाला विश्वस्त मंडळ, अहमदाबाद, मूल्यं ५ रूप्यका :

शके १८७८–८२ या पांच वर्षांचें पंचांग पंचांग तयार करणारे, फलज्योतिषी व खगोलशास्त्रज्ञ यांना उपयुक्त व्हावें अशा प्रकारचें, आधुनिक खगोलशास्त्र विचारांत घेऊन, गणनपद्धतीचें विवेचन करणारें हें संस्कृतांत लिहिलेलें पुस्तक आहे. प्रा. ह. प्रा. भट्ट यांनीं त्याचें संपादकत्व केलें असून तें प्रस्तुत क्षेत्रांतील पांच प्रसिद्ध विद्वानांच्या समितीनें तयार केलें आहे. प्रस्तुत विषयाच्या अभ्यासकांनीं तें अवश्य पहावें असें वाटतें. **का. सं.**

प्रा ज्ञ पा ठ शा ळा म ण्ड ळ – ग्र न्थ प्र का श न

## वै दि क सं स्कृ ती चा वि का स

लेखक- **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी,**

वैदिक संस्कृतीचें विकसित रूप म्हणजेच आजची भारतीय संस्कृति होय. भारतीय संस्कृतीच्या जन्मापासून आतांपर्यंत झालेल्या स्वरूपाचें वर्णन या पुस्तकांत प्राधान्यानें केलें आहे. वैदिक संस्कृतीच्या अभ्यासकास अत्यंत उपयोगी आणि मराठी भाषेंतील अत्यंत आधुनिक अशा प्रकारचें हें पुस्तक आहे.

किंमत ६ रु.

प्रकाशक :-- **व्यवस्थापक प्राज्ञपाठशाळामंडळ**

**वाई ( जि० उ. सातारा )**

卐 卐 卐 卐

## मा न वा चा आ द र्श

किं. तीन रुपये ( ट. खर्च निराळा )

लेखक

**श्रीमती एलन रॉय**

**शिवनारायण रे**

अनुवादक- प्रा. गोवर्धन पारीख

विशेष माहितीसाठीं लिहा

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई जि. सातारा

संघाची स्थापना केली होती हेंच सिद्ध होतें. मात्र ती कदाचित् मोठ्या प्रमाणावर नसेलहि.

डॉ. वैद्य यांचें म्हणणें आहे कीं पश्चिमेकडे केकय अर्थात् अफगाणिस्तानमध्यें जैनधर्माचा प्रचार झाला होता. तथापि हें म्हणणेंहि फारसें ग्राह्य वाटत नाहीं. जैन आगमामध्यें ज्या २५ १/२ आर्य देशांची गणती केली आहे त्यांत केकयार्धहि आहे. तथापि हा केकय उत्तरेकडील केकय म्हणजे अफगाणिस्तानाहून भिन्न होय. जैन सूत्रांमध्यें केकयच्या अर्ध्या भागाला आर्यक्षेत्र मानण्यांत आलें आहे; यावरून असें दिसतें कीं या प्रदेशांतील थोड्याशा भागांतच जैनधर्माचा प्रसार झाला असावा. कदाचित् उर्वरित भागांत रानटी जमाती रहात असाव्यात. केकय श्रावस्तीच्या ईशान्येस नेपाळच्या तराईत होता. सेयविया ( बौद्धांची सेतव्या ) ही या देशाची राजधानी होती. हें शहर कोशल देशांत होतें. महावीर याच शहरांत राहिला होता.

तथापि या मुद्द्यांमुळें पुस्तकाचें महत्त्व कमी होत नाहीं. भारतीय संस्कृति व वाङ्मय सामान्य माणसांपर्यंत पोहोंचविण्याच्या हेतूनें या व्याख्यानमालेचा उपक्रम सुरू केल्याबद्दल नागपूर विद्यापीठाचें अभिनंदन केलें पाहिजे. भविष्यकाळांतहि तो तसाच चालू राहील अशी आशा आहे.

— जगदीशचंद्र जैन

**आहार आणि शरीरपोषण** : डॉ. वि. ना. पटवर्धन, प्रका० नागपूर विद्यापीठ, नागपूर, १९५६, पृ. २८, किंमत १ रुपया.

सुप्रसिद्ध आहारशास्त्रज्ञ डॉ. वि. ना. पटवर्धन यांचीं नागपूर विद्यापीठातर्फे झालेलीं " आहार आणि शरीरपोषण " या विषयावरील हीं व्याख्यानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध करून विद्यापीठानें मराठी वाचकांवर फार मोठे उपकार केले आहेत. दैनंदिन जीवनांतील या अत्यंत जिव्हाळ्याच्या विषयावर मराठींतील ग्रंथसंपत्ति अगदींच तुटपुंजी आहे. हिंदी आहारांतील नेहमीच्या निरनिराळ्या पदार्थांचें शास्त्रीय विश्लेषण करून आहाराचा व आरोग्याचा संबंध व आहारजन्य रोग यांचें अत्यंत सोप्या भाषेंत विवेचन करणारीं हीं व्याख्यानें सर्वांना मार्गदर्शक वाटतील याबद्दल मुळींच संशय नाहीं.

हिंदी आहार हा धान्यावर अधिष्ठित असल्यानें त्यांत कार्बोज प्रमाणाबाहेर आढळतें; आणि शरीराच्या वाढीस व पोषणास आवश्यक असें प्रोत नुसतें कमी प्रमाणांतच नव्हे तर शाकाहारामुळें निकृष्ट प्रतीचें असतें. इतर जीवनोपयोगी पदार्थांची व विशेषतः जीवनसत्वांची कमतरतासुद्धां फारच मोठी असल्यामुळें एकंदरीनें हिंदी आहार शरीरपोषणाच्या व वाढीच्या दृष्टीनें निकृष्ट ठरतो.

निकृष्ट आहार असण्याचें पहिलें कारण दारिद्र्य. त्यांतच अज्ञान व जुन्या रूढ कल्पनांची भर. "पुराणकाळांत रूढ असलेल्या कल्पना, त्यांत तथ्य नाहीं असें आढळून आल्यावरहि, उराशीं बाळगून बसण्यानें कोणाचेंहि कल्याण होणार नाहीं," हा डॉक्टरसाहेबांचा इषारा आहारासारख्या जिव्हाळ्याच्या बाबतींत तरी आमच्या पचनीं पडणें अत्यंत आवश्यक आहे.

ही माहितीपूर्ण व अत्यंत महत्त्वाची पुस्तिका प्रत्येक घरांत असणें व अभ्यासली जाणें फार आवश्यक आहे.

इं. पा.

वेधशालापंचांगम्. सं. २०१२–२०१७ : रचयित्री वेधशाला विद्वत्समितिः, प्रका०: वेधशाला विश्वस्त मंडळ, अहमदाबाद, मूल्यं ५ रूप्यकाः

शके १८७८–८२ या पांच वर्षांचें पंचांग पंचांग तयार करणारे, फलज्योतिषी व खगोलशास्त्रज्ञ यांना उपयुक्त व्हावें अशा प्रकारचें, आधुनिक खगोलशास्त्र विचारांत घेऊन, गणनपद्धतीचें विवेचन करणारें हें संस्कृतांत लिहिलेलें पुस्तक आहे. प्रा. ह. प्रा. भट्ट यांनीं त्याचें संपादकत्व केलें असून तें प्रस्तुत क्षेत्रांतील पांच प्रसिद्ध विद्वानांच्या समितीनें तयार केलें आहे. प्रस्तुत विषयाच्या अभ्यासकांनीं तें अवश्य पहावें असें वाटतें. **का. सं.**








卐 卐 卐 卐



अनुक्रमणिका








Regd. No. B. 5177







अनुक्रमणिका






